# बोधिवृक्ष

प्रस्तावना

एका अपूर्ण, आजवर अप्रकाशित असलेल्या, सावरकरांनी स्थानबद्ध असतांना लिहिलेल्या, राजपुत्र सिद्धार्थाच्या राजत्यागामागील, पत्नी-पुत्रत्यागामागील भूमिका सांगणाऱ्या 'बोधिवृक्ष' नाटकांतील उपलब्ध झालेले सर्व प्रवेश केवळ व्याकरण दृष्टीने आवश्यक त्या शाब्दिक सुधारणा करून समग्र सावरकरमधील नाटक खंडात प्रसिद्ध करीत आहोत. हे प्रवेश नाटक म्हणून सलग नसले तरी ते विचारपूर्ण आहेत. भगवान श्रीकृष्ण, भगवान बुद्ध यांचे विचार-मार्ग वेगळे असले तरी ध्येय एकच आहे. यश, श्री, कीर्ती, ज्ञान, पराक्रम आणि वैराग्य ज्यांना प्राप्त झाले त्यांना भगवान म्हणावे अशी एक व्याख्या आहे. या व्याख्येनुसार लेखक, कवी, वक्ते आणि या बोधिवृक्ष नाटकाच्या दुसऱ्या अंकात सिद्धार्थाने जशी मार नि वासना यावर मात केली तशीच जन्मठेपेच्या कठोर शिक्षांवर आणि प्रलोभनांवर मात करणारे नाटककार सावरकर होते. दोघांनीही दीन, दुर्बळांना सुखी करण्यासाठी त्याग केला. कष्ट सोसले. अंतर एवढेच की सिद्धार्थ राज्यत्याग करून, संन्यास घेऊन तृष्णात्याग हा सुखाचा मार्ग आहे असे सांगत होते तर वीर सावरकर सांगतात की स्वतृष्णा भागविण्यासाठी दुसऱ्यांना पीडणाऱ्या स्वार्थी आणि दुष्ट प्रवृत्तींच्या दुर्जनांचा नाश करा. त्यासाठी स्वतृष्णा मारूनही वैराग्य नि वीरवृत्ती धारण करा!!

भगवान बुद्धाने राज्यत्याग करून, संन्यास घेऊन लोकजागृती केली. तर वीर सावरकर यांनी संन्यासी वृत्तीने राजकारण केले आणि शेवटी देह पूर्ण कार्यक्षम राहिला नाही तेव्हा तोही सोडून देऊन आत्मार्पणही केले!! संन्यस्तखड्ग नाटकाचे शेवटी त्यांनी 'तयोस्तु कर्मसंन्यासात् कर्मयोगो विशिष्यते' हे वचन दिले आहे. असे मतभेद असताही सावरकरांनी या नाटकात आणि संन्यस्त खड्ग नाटकांतही भगवान बुद्धाची पत्नी, पुत्र, पिता, माता आणि राज्य यांचा त्याग करण्यामागील विचार, त्यांना स्वतःलाही पटत असावेत इतक्या चांगल्या पद्धतीने मांडले आहेत, सांगितले आहेत. त्याचप्रमाणे त्यांची प्रिय पत्नी यशोधरा हिचेही विचार देशभक्त आणि सैनिकांच्या बायकांनी मनन करण्यासारखे आहेत. वर्तन अनुकरणीय आहे. हे नाटक अपूर्ण असले तरीही काही वाचकांना ते विचारप्रवर्तक म्हणून आवडेल ही आशा!

**अंक पहिला - प्रवेश पहिला**

(यशोधरा नवजात शिशूसह पलंगावर बसली आहे. तिच्या बहिणी आणि सख्या तिच्याशी बोलत आणि सारंगी वाजवीत गाणे गात आहेत.)

मधुरा : राज्ञी यशोधरे! ह्या तुझ्या चिमुकल्या राजबिंड्याच्या नयनकमल पाकळ्या अजून पुरत्या उमलल्या नाहीत; तोच पाहिलेस का सारंगीच्या कोमलसुरांनी हसू येऊ लागले आहे ते, बघ! कस शोभते आहे बाळ ते! जसे हरणाचे पाडस! वदनावर हसू कसे खेळत आहे; जसे कमलावर चांदणे! मंजुळे, म्हण ग पुन्हा एखादे गोड गाणे.

यशोधरा : ते तुझे उर्मिलेचे गाणे आहे ना मंजुळे, तेच म्हण. मला आताशी तेच ऐकावेसे वाटू लागले आहे.

मधुरा : इश्श ते नको. वैराग्य भाराने जड झालेले मोठ्या माणसांचे गाणे आम्हाला, आमच्या ह्या छकुल्याच्या अल्लड मनाला रुचेल असे एखादे साधे काऊ-चिऊ-माऊचे हलकसे गोड गाणे म्हण.

यशोधरा : ते का? तुझ्या बाळाची तेवढी आवड आणि आमची नाही की काय? बाळ, अजून राजपुत्र आहेत; राजे झाले नाहीत म्हटले अजून. माझे श्वशूरांची, शुद्धोधन महाराज यांची राजवट चालू आहे. जन्मताच इतकं अगदी चक्रवर्तीत्व नको गाजवायला तुझ्या बाळराजांनी! तुझ्या बाळ राजांची राणी जेव्हा येईल तेव्हा तिच्यावर त्यांची राजाज्ञा चालवा, माझ्यावर नाही.

मधुरा : छकुल्या, माझ्या बाळराजा! बघा बरे का! ही तुझी आईच तुझा मत्सर करते आहे; मी तुझी मानलेली मावशी तुझा पापा घेत आहे. मग दे मला एक गोड पापा. दे दे. बरे बाई तुझीच राजाज्ञा चालू दे हो. मंजुळे, म्हण ते ताई सांगते ते गाणे. (मंजुळा उर्मिलेचे गाणे म्हणते.)

यशोधरा : (उसासा टाकून) खरेच! मंजुळे मला किनि आताशी हे गाणे ऐकावसे पण वाटते आणि ते ऐकल्यावर कसले काय की; भय पण वाटते. परवा हे गाणे ऐकत असताना मला चुटका लागला आणि एक स्वप्न पडले की, जसे हे माझ्या पतीचे, राजपुत्र सिद्धार्थाच सुंदर विलास मंदिर आणि तुम्ही माझ्या प्रेमाच्या बहिणी, हे आपले हे राजनगर, हे सगळं दृश्य अकस्मात मावळून मी अयोध्येच्या एका ओसाड राजवाड्याच्या उजाड दालनात एकटीच, एका कोपऱ्यात डोळे

पुशीत पडलेली आहे. आणि लोक मला दुरून म्हणताहेत; ती पहा! दुसरी उर्मिली, आणि माझे पती, राजदूत, सिद्धार्थ माझ्या जवळ असून देखील मला दिसेनासे होत आहेत.

मधुरा : वेडी कुठली! यशोधरे, रामलक्ष्मणाचे वडील जसे कैकेयीच्या पेचात फसले होते तसे तुझे श्वशूर शुद्धोधन महाराज काही कोण्या तरुण जखणीच्या पंज्यात गवसलेले नाहीत, तुझ्या पतींना, राजपुत्र सिद्धार्थांना वनात धाडून तुझ्यावर सीतेच्या उर्मिलेच्या दुःखाची पाळी आणायला.

यशोधरा : मधुरे, सीतेच्या दुःखालाही मी भीत नाही इतकी उर्मिलेच्या दुःखाला भिते. सीतेला वनवासात प्रियदर्शन घडे; रामचंद्राच्या दैवी संगतीचे सुख मिळे. पण बिचारी उर्मिला तिला पतीबरोबर वनवासाचे दुःख भोगण्याचे सुख सुद्धा कोणी देईना. तिला एकटी टाकून लक्ष्मण निघून गेले; का? तर त्यांना ब्रह्मचारी होऊन वनात जावे असे वाटले. पण मी म्हणते; ज्यांना ब्रह्मचारी राहण्याची हौस असेल त्यांनी तो निश्चय लग्नापूर्वी करावा. लग्नानंतर ब्रह्मचारी व्रताचा निश्चय त्यांच्या एकट्याच्या लहरीसरशी करण्याचा त्यांना अधिकार पोचत नाही. दोघांच्या सामाईक असलेल्या प्रासादास असा एकटा जसा भंगू शकत नाही; तसंच दांपत्य जीवनाचे लताकुंज एकट्याला छिन्नविछिन्न करून टाकायला येणार नाहीत! पण बिचारी उर्मिला, बिचारी अबला, पतीच्या लहरीसरशी, विरहाच्या ओसाड दुःखाच्या तटावर, जळातून मासा फेकून त्याच्या तळमळणाऱ्या आत्म्यास फेकून देण्यात येते तशी फेकली गेली. कोणी सांगावे! माझ्या प्रियपतिदेवांना, सिद्धार्थांनाही, अशी ब्रह्मचर्याच्या आणि श्रमण-संन्याशाच्या जीवनाची लहर पुढे मागे येणार नाही म्हणून! पहा! तसे ना आताशी वारंवार म्हणायचे असते की हा संसार किती क्लेशकारक आहे! तो परवा कोणसासा श्रमण भेटला; तेव्हापासून तर इकडची चित्तवृत्ती फारच उदासीन दिसते नाही का ग; म्हणायचे असते त्या श्रमणासारखे यती होणे किती सुखकारक आहे! काय होईल काय जाणे बाई?

मधुरा : अग ताई, काय होणार ह्याचाच सारखा विचार केला तर शहाण्यांनासुद्धा वेड लागेल. तुझ्यावर पुढे सीतेची पाळी येते की, उर्मिलेची येते की, दोघींचीही येत नाही की, दोघींचीही आळीपाळीने येते ती आज कशाला चिंता. अग, स्त्रियांना सोडून जाणे, तोंडच्या गोष्टी नाहीत. रामचंद्रांसारखे देखील सीता दिसेनाशी झाल्याबरोबर ढळाढळा रडले; लता वेलींना देखील हे सीते! हे सीते! म्हणून भेट देऊ लागले. तूही सीतेसारखी स्वयंवराची, स्वतः सिद्धार्थांच्या आवडीची राणी

आहेस उर्मिलेसारखी. रामाने सीतेला वरली; म्हणून लक्ष्मणाला बापाने वरावयाला लावलेली आपली दुसऱ्याने मारलेल्या गाठीची नव्हेस!

मंजुळा : खरेच, मधुरे आपल्या ताईच्या, यशोधरेच्या, स्वयंवराची सुंदरकथा सांग मला सविस्तर, मी लहान होते ग तेव्हा.

मधुरा : तू केव्हा लहान होतीस हे अगदी एवढे निक्षून सांगण्यात तुझा असा भाव आहे की, काय? की, त्या वेळेस तू स्वयंवरात भाग घेण्याइतकी उपवर झालेली असतीस तर यशोधरेस त्या स्वयंवरात यश मिळण्याची संधी अशी साधता येती ना!

यशोधरा : (हसून) होय ग मंजुळे?

मंजुळा : इश्श! ही ग काय मधुरे तुझी नसत्या कलागती लावण्याची दुष्ट खोड?

यशोधरा : अग, मग त्यात बिघडले कुठं मंजुळे! तू माझी धाकटी बहीणच ना? स्वयंवरात तुला यश आले असते तर त्यातही मला भूषणच वाटले असते!

मधुरा : खरेच ते बाळे! जसे त्या स्वयंवरात यशोधरेस सिद्धार्थांनी वरले तरी वडील बहिणीच्या वशिल्याने ओळख पाडून शेवटी तूही त्याची एक वरमाळ आकर्षून घेतलीसच! तसंच तुला त्यांनी प्रथम वरले असते तर धाकट्या बहिणीच्या वशिल्याने यशोधरेनेही सिद्धार्थाची कोणची तरी एक वरमाळ आकर्षिली असती!

मंजुळा : पण मी तुला ते का विचारते आहे? मला त्या स्वयंवराची गंमत सांग! मला इतकंच आठवते की, राजकुमार सिद्धार्थांचे मंदिरात शाक्यकुळांतील सुंदरांतील सुंदर मुलींचे, सम्मेलन भरले आहे आणि मी आईचा पदर धरून तिथे उभी आहे. पुढे काय झाले?

मधुरा : पुढे किनी, त्या कुमारिकांचे कळप, हंसदीपकांचे कळपांसारखे नाचून गाऊन थकल्यावर राजकुमाराकरवी त्यांना पारितोषिके देण्यात आली. एकेक कन्यका एकाहून एक सुंदर राजकुमारापुढे येई. शेले, अलंकार, भूषणे, काय तो उपहार घेई. कोणी कलिकेसारख्या लज्जेने कापत, कोणी बिचकलेल्या हरणीसारख्या वावरत, कोणी चित्रासारख्या स्तंभित होऊन न्याहाळीत; पण सिद्धार्थांची मुद्रा, लेशमात्र विचलित होईना. त्यांचे लक्षच जसे तिकडे नव्हते, शेवटी आपल्या सुप्रबुद्धाची ही चांदणीसारखी कन्या निरोप घेण्यास आली तेव्हा मात्र राजकुमार चमकले. चटकन्

आपल्या गळ्यातील रत्नहार राजकुमारांनी ह्या चटकचांदणीस घातला; आणि तिने पण कामदेवाच्या फुलधनूसारखे आपले बाहुपाश सिद्धार्थांच्या कंठांत घालून आपले प्रेमविव्हलमस्तक त्यांच्या विशाल वक्षःस्थलावर ठेवले.

यशोधरा : (मधुरेला अडवून) वा! नाही, नाही ग चहाटळे! लागलीस अं! तिला भलते सलते सांगायला! राजकुमारांनीच माझ्या गळ्यात हार घातला आणि मी, लगेच मी माझ्या सख्यांबरोबर निघून गेले ग मंजुळे!

मंजुळा : पण ते बुद्धी बलांचे सामने आणि ती शस्त्रविद्येची प्रतिस्पर्धा केव्हा झाली? खरे, सांग ग मधुरे!

मधुरा : आता खरेच सांगते! यशोधरेस मागणी घालताच आपले वडील सुप्रबुद्ध म्हणाले, क्षात्र रीतीप्रमाणे शस्त्र विद्येत जो श्रेष्ठ ठरेल त्याला कन्या देणे योग्य. तेव्हा शस्त्रप्रतिस्पर्ध्यांचे सामने झाले. अग दोन जुळे तरु सिद्धार्थाने इतके जलद खड्गाचे एका घावासरशी साफ कापून टाकिले की, ते काही वेळ उभेचे उभेच होते. प्रतिस्पर्ध्यास वाटले वार खाली गेला आणि ते हसू लागले; तो वारा सुटताच ते तरु कोलमडून पडले आणि सिद्धार्थांचा जयजयकार झाला. तसाच धनुर्विद्येत पण सगळ्यात कठीण प्रसंग, अश्वविद्येच्या प्रयोगात होता. अग! उभ्या शाक्यकुळात ज्यावर कोणी स्वारी भरीना; असा एक काळाकुट्ट आडदांड घोडा, लाल लाल डोळ्यांचा, आगीसारखे रागीट श्वास सोडीत पुढे आला. जो चढे त्याला खाड्दिशी फेकी; टाच हाणी; पायावर उभा राही; शेवटी तर त्रासून वादळी समुद्रासारखा तोंडी फेसाळला, फुरफुरू लागला नि पिसाळून डसू लागला.

मंजुळा : बाई! माझ्या अंगावर काटा उभा राहात आहे. मग सिद्धार्थाचे काय झाले? काय, आता सांगणार आहेस! काय की बाई?

मधुरा : त्यांनी त्याचे मानेचे आयाळ धरून नुसत्या मांडीने स्वारी भरली; आणि तो घोडा तत्काळ नरमला; नी दहा भरधाव चक्कर सरळपणे फिरून आला. उभ्या शाक्यमंडळाने मोठा जयघोष केला आणि यशोधरेस सिद्धार्थाला अर्पिली. मंजुळे, राजकुमार सिद्धार्थांना लहानपणापासूनच वनात श्रमण होऊन जावे म्हणून लहर येई. त्या उदास विचारापासून त्यांना नित्याचे पराङ्मुख करावे म्हणून त्यांच्यावर हा सौंदर्याचा मोहन-मंत्र राजमंत्र्याकडून टाकण्यात आला. त्या दिवशी, यशोधरेने उत्तमातील उत्तम अशा मोगऱ्यांच्या फुलांची जी माळ राजकुमारास घातली आणि

रानावनात भटकणाऱ्या त्या दिग्गजास आपल्या त्या मोगऱ्याच्या माळेने तिने त्या दिवशी जे बांधून टाकिले ते आजपर्यंत!

यशोधरा : सखे मधुरे! पण ह्या आजच्या उद्याचे काय? ती फुलमाळेची बेडी, त्या दिग्गजास आजवर बांधू शकली; त्याचे कारण तिचे बल नव्हे पण तिने आपणास बांधावे; अशी स्वतः त्या दिग्गजांची इच्छा होती. त्यातही राजकुमारांना लहानपणापासूनच संसारविषयक उदासीनतेची जी लहर येई तिची, संसारातील दुःखांचा लवलेशही दिसताच, पुन्हा उठावणी होण्याचा संभव उरू नये म्हणून, माझे सासरे, महाराज शुद्धोधन ह्यांनी अगदी कपिलवस्तू नगराबाहेर सुखांचा केवळ स्वर्गच असे विलासभुवन निर्माण करून त्यातच राजकुमारांनी रहावे, रमावे, म्हणून ही नवी व्यवस्था केली. अग! जुई-मालतीच्या मंडपाखाली फुलांचा सडा पडतो न पडतो तोच तो वेचावा लागतो!

कारण एकदा तो फुलांचा सडा सुकलेला दिसला तर सिद्धार्थांच्या वदनावरील हास्यही चटकन कोमेजून गेले आणि म्हणायचे झाले, अहो, सर्व सौंदर्य असे क्षणिक आहे. हाय हाय! जे जे फुलते नं, ते संध्याकाळी सुकते! पण सखे, फुललेल्या फुलांपैकी कोमेजलेले एक फूल देखील तिथं दिसू नये, इतक्या काळजीने जे हे प्रीतीचे मनोहर उपवन एखाद्या सुखाच्या स्वप्नासारखे भासत आहे. त्यातही सिद्धार्थांना दुःखाची पोटस्वप्ने पडायची ती पडतातच. त्याला काय करावे? अशा स्थितीतही फुलमाळेची शृंखला तोडून; तो दिग्गज केव्हा उफाळून निसटेल; ह्याचा काही नेम आहे का?

मधुरा : नियम आहेत सखे यशोधरे! तुझ्या नित्याच्या अल्लड छकुल्याला ह्या त्यांच्या नवजात तनयाला पहिल्यानेच पाहण्यास आज सिद्धार्थ येणार आहेत ना? तर मग बघ गंमत! मी काय म्हणते याची! अग! ह्या आपल्या मनोहर चिमुकल्या तनयाच्या सुंदर स्मिताच्या किरणांची ही वात्सल्यमाला राजकुमार सिद्धार्थांच्या हृदयास तुझ्या वरमालेहूनदेखील हडसून खडसून बांधून टाकील!

मंजुळा : राजकुमार येताच ह्या छकुल्याची लखभेट, त्याचे हाती देण्याचा पहिला मान माझा बरे का! मावशीच ना मी त्याची ती?

मधुरा : अग आलेच सिद्धार्थ! अंहं तू नकोस उठू अशी; आम्ही सांगू कुमारांना की अजून वागावयास निघाली नाही ती, आमची राजबाळंतीण? हं! मुलींनो! सुख क्षणिक म्हणून दुःखासारखंच त्याज्य, ह्या श्रमण-संन्याशाच्या पालुपदास, तोड म्हणून रचलेले ते तुमचे गोड गाणे गा बरे का? अगदी सुरांगनांसारखे गा! अगदी सलिला लहरीसारखे! सलीलना दमलात तरी सुस्कारा सोडू नका! हं! हो न जाणो तसल्या सुस्कारांच्या फुंकरासरशी देखील राजकुमारांच्या कोमल मनाला दुःखाचा धक्का बसायचा!

(राजकुमार सिद्धार्थ येतात; मुली नाचू गाऊ लागतात. सिद्धार्थ, यशोधरेच्या शेजारी बसतात.)

सिद्धार्थ : (गाणे संपताच थांबवून) यशोधरे एक गुलाब फूल सुकले तो दुसरे फुलते म्हणून माळ्याला सदोदित गुलाब फुले मिळत राहतील; ही आश्वासक हमी हे गाणे देत असले तरी स्वतः माळ्याची गुलाब उपभोगण्याची इंद्रियशक्तीच केव्हाच विफल होणारी असल्यामुळे इंद्रिय सुख नित्य रहाणारे नाही ते नाहीच. ह्या दुःखद शंकेचे हे गाणे काय समाधान करते?

मधुरा : राजकुमार, असल्या नसत्या शंकांचे समाधान करीत बसण्यास माझी यशोधरा कुणी एखादा भंगड गोसावी बैरागी आहे की काय? आज युगानुयुगे सहस्त्रावधी मोठमोठे जपीतपी, श्रमणसंन्यासी, अवतारी अवधूत आपल्यासारखे विचारीत आले, पण त्यांचे उत्तर कोणीतरी दिले का? जेव्हा कोणी ते उत्तर देतील तेव्हा आम्ही पण ही गुलाबांची गाणी सोडून देऊ नि श्रमणींच्या गाथा म्हणू. पण आज आम्ही आमच्या बाळराजाच्या मंजुळ अंगाईवाचून आणि प्रेमपाळण्यावाचून दुसरे काही एक गाणार नाही; ऐकणार नाही. कारण आज आपण आमचे महाराज नव्हेत तर आमच्या राजबिंड्याचे राजपिता आहात! आण ग मंजुळे इकडे तो आपला चिमुकला राजा, पहावा महाराज शुद्धोधन महाराजांचा नातू! राजपुत्र सिद्धार्थ आणि राजकन्या देवी यशोधरा ह्यांचा तनय! उभ्या शाक्य राष्ट्राचा लाडका चिमुकला राजा!

मंजुळा : अग पदव्याचे एवढे भारूड सांगण्यापेक्षा नुसते सांगायचे की, मंजुळेचा मोहक भाचा तो हा, म्हणजे त्यात सगळं महत्व आले! घ्यायचे म्हटले महाराज! एकदा छकुल्याला घ्या! उभ्या शाक्यकुलात आज आपल्या तनयाच्या जन्मार्थ आनंदी आनंद होत आहे.

सिद्धार्थ : (मुलास किंचित कुरवाळून उदास सुस्कारे टाकतो.)

यशोधरा : मंजुळे, मधुरे उभ्या शाक्य राष्ट्राच्या घरोघर ज्या कारणासाठी आनंदी आनंद होत आहे, म्हणून तुम्ही म्हणता त्याच कारणासाठी सिद्धार्थांना दुःखाचे सुस्कारे सोडावे लागत आहेत. आण इकडे बाळाला. तुम्हाला त्याचे प्रेम वाटले म्हणजे सगळ्यांनाच वाटले पाहिजे, असे नाही.

सिद्धार्थ : देवी, माझ्या प्रियजात भार्ये, स्वतःच्या नवजात शिशूला पाहून सिंहिणीलासुद्धा पान्हा फुटतो; क्रूरातील क्रूर सिंह देखील त्याला गायीसारखा अलगद चाटू लागतो. श्वापदांना देखील प्रेमाने मोहीत करणारा हा अपत्य स्नेह मला मोहीत नाही असे कसे होईल? तुमच्यातील कोणाचीही बालकावर पहाताच प्रीती बसली नसेल इतकी प्रीती माझी बसली आहे. त्याचे प्रत्यंतर म्हणजे माझे हे दुःखाचे सुस्कारेच होत! आश्चर्य वाटते तुम्हाला? मधुरे! समज एखादे सुंदर रानपाखरू राजद्वाराच्या वरील पिजऱ्यात कोंडून टाकले नि दास, दासी, राजा, राणी त्या सुंदर पाखरास आपल्या पिजऱ्यात अडकलेले पाहून आनंदीत झाले, पण राजाचा एक कुमार मात्र दुःखीत होऊन विचार करू लागला की, अरेरे! ह्या पाखरास, ह्या निरुंद पिजऱ्यात, परतंत्रपणाची कोमल पीडा होत असेल; ह्याला येथून सोडून देण्याची युक्ती मला सुचेल तर किती बरे होईल - आता मधुरे तू सांग! त्या पाखरावर खरे प्रेम कोणाचे, त्या राजाच्या दासदासींचे की त्या राजकुमाराचे?

मधुरा : मी नाही सांगत; मला माहीत आहे. माझ्याच तोंडून काहीतरी काढायचे असेल उलटसुलट.

मंजुळा : बरे! मी सांगते, त्या पक्षाला पिजऱ्यात पडलेला पाहून, दुःखी झालेल्या राजकुमाराचे प्रेम अधिक!

सिद्धार्थ : त्याचप्रमाणे प्रिय यशोधरे त्या तनयाचा लाभ तुम्हाला झाला म्हणून तुम्हाला आनंद वाटत आहे. पण त्या तुमच्या लाभात त्याची काय हानी झाली आहे, इकडे तुमचे लक्षच नाही. म्हणून तुमचे प्रेम स्वार्थी आहे, पण मला हा निरपराधी चिमुकला लाडका जीव ह्या दुःखपूर्ण संस्कृतीच्या पिजऱ्यात हा फसला म्हणून दुःख होत आहे. त्याला ह्या पीडादायक पारतंत्र्यातून मुक्त कसे करावे, ह्या विवंचनेने सोडलेले हे माझे दुःखी सुस्कारे त्याच्या विषयीच्या निस्वार्थी प्रेमाने, तुमचा आनंदी हुरूप पाहून अधिक थबथबले आहेत.

यशोधरा : एखाद्या भिकाऱ्याच्या पोटी मार्गाने भीक मागत चालता चालता जे मूल जन्माला येते, त्याच्या अपंग पित्याला असा शोक शोभता खराच. कारण हाल अपेष्टांच्या पिंजऱ्यात त्याच्या माता पित्यांनी त्याला कोंडले असे म्हणता आले असते. पण माझा हा राजबिंडा पुत्र शुद्धोदन महाराजांचा नवसासायासांचा नातू आहे. ह्या शाक्यांच्या राज्याचा गर्भश्रीमंत वारस आहे.

सिद्धार्थ : हाय! हाय! यशोधरे, भिकेच्या वाटेने लागणाऱ्या झाडाच्या सावलीवाचून जिच्या प्रसूतीला छायेचे स्थळ मिळत नाही आणि ज्यांना स्वतःलाच खायला मिळत नसल्यामुळे मुलास पोटभर पाजतील, इतके दूध कधीच मिळत नाही, अशा शेकडो भिकारणी आया ह्या जगात आहेत तर! आणि त्यांच्या पोटी जन्मताच मरायला घातलेली अशी दुर्दैवी लेकुरे जन्माला येतात तर! तर मग राजविलासाच्या ह्या एका गर्भश्रीमंत बाल वारसाच्या जन्मासाठी मी किती हसू? आणि ह्या असंख्य निरपराध जिवांना जन्मताच हाल अपेष्टांत तळमळावे लागते, त्यांच्यासाठी दुःखाचे किती सुस्कारे सोडू? ते, तूच मला सांग! यशोधरे, केवळ राज्याचा वारस म्हणून हे आपले प्रिय बाळ सुखातच लोळणार ही तुझी समजूत हीही एक भूल आहे. ह्याला ताप आला, तर त्या राज्यातील कोणाला तरी तो वाटून घेता येईल का? ह्याला कांजिण्या निघाल्या; देवी आल्या; तर ह्या प्रेमळ दासदासी, त्याच्या पीडेस स्वतः भोगू शकतील का? वेडे! राजाचा मुलगा झाला तरी तो काही उपजतच बोलत नाही. बाळपणासारखे सुख नाही, म्हणून म्हणणारे म्हणोत! पण बाळपणासारखे दुःखही नाही! एक दिवसही कुणी मायेचे जवळ नसले तर जगणेच कठीण! काय दुखत आहे, सांगता येत नाही. काय सांगतात समजत नाही. दुखते पोट! आणि लडिवाळ माता ते न कळून ओढे घालते डोक्यावर! प्रकाशात दिव्याने हात भाजतो; अंधेरात आईचाच पाय पडून, एखाद्या द्राक्षासारख्या मुलाचा चेंदामेंदा होऊन जातो! अहो, आपल्याच मलमूत्रात लोळत ज्या वयात अंग लडबडलेले असते, आणि ती लडबडलेली बोटे तोंडात घालून चोखली जातात, त्या मलीन, असहाय आणि परतंत्र बाळपणासारखी दुसरी दैना नाही! अशा दुःखात ह्या आपल्या लाडक्या तनयास ढकलण्याच्या क्रूरपणाचे आम्ही मातापितर वाटेकरी आहोत! छे! छे! ह्या क्रूरतेचे मला प्रायश्चित्त घेतलेच पाहिजे आणि ते म्हणजे हेच की जन्माचे कारागृहात पडलेल्या ह्या दुःख -शोकग्रस्त संसारातून सोडवण्याची काही तरी तोड काढणे! प्रिये यशोधरे! मधुरे! मंजुळे! आता बरीच रात्र झाली आहे, निजा तुम्ही. आम्ही बाहेर उद्यानातील चांदण्यात काही काळ एकांती विचार करीत बसू इच्छितो. (जाऊ लागतो.)

मधुरा : पण जरा राजकुमार थांबावे थोडेसे; ह्या पुत्रजन्माचा आनंदोत्सव यशोधरा

यशोधरा : मधुरे! जाऊ दे! कुमारांनी सांगितले नाही का, की त्यांना पुत्रजन्माची ही गोष्ट अत्यंत दुःखाची भासते! कशाला अडवलेस त्या दुःखद स्थली त्यांना? हे काय? खरेच का गेले? मंजुळे! अग खरोखरीच जाऊ कसे दिलेस त्यांना? (मंजुळेच्या गळा पडत) माझे भगिनी! माझे सखे! राजकुमार सिद्धार्थ जगाचे दुःखाचा नाश करणारा मार्ग शोधीत आहेत, जगात आपली गणती थोडीच आहे? आपले दुःख म्हणजे राजाचा फन्ना! आमच्या दुःखापासून त्यांनी शक्य तितकं दूर जावं, हाच तेवढा, आमचे दुःख दूर करण्याचा उत्तम उपाय! मधुरे! ती प्रेमाची जुनी श्रृंखला कमी पडेल म्हणून तू ही वात्सल्याची नवी शृंखला तू त्या दिग्गजाचे पायात घालायला गेलीस तर तो अधिकच बिथरून निसटला!

मधुरा : उगी, सखे, उगी, अग जाईल हीही लहर आली तशी! आता किनी तू थोडी स्वस्थपणे नीज. तुला जागरण सोसणार नाही. मुलींनो! एखादे गोड गीत गा. ते ऐकता ऐकता देवीला गुंगी आली म्हणजे निजा सगळ्या हं.

(पडदा पडतो.)

**अंक पहिला प्रवेश दुसरा**

छंद (स्वगत) : राजकुमार सिद्धार्थांचा लहानपणापासूनच वैराग्याकडे ओढा. मन सदा उदास, म्हणून त्यांना संसारात गुंतवून टाकण्यासाठी हे विलास भवन बांधले. मी त्यांचा आवडता सारथी. म्हणून ह्या विलासभवनात राहून नि सिद्धार्थांचे लक्ष सदोदित सुखकारक विषयांकडे वळवून; त्यांचे चित्त प्रसन्न राखण्याचे काम, शुद्धोदन महाराजांनी मला दिले. पण आजकाल इथेही सिद्धार्थ अगदीच उदास झाले आहेत. त्यांच्या संगतीत गेले की, मलाही उदास व्हावेसे वाटते. तथापि आपले कर्तव्य असे चुकता कामा नये. आता ते इकडे चांदण्यात येणारच आहेत. आलेच वाटते. छंदा! काही झाले तरी तू मात्र उदास दिसता कामा नये. सदा हसरी मुद्रा ठेव आणि जग दुःखमय असे वाटले तरी तसे म्हणू नकोस, आणि ते सुखमय आहे असे वाटले नाही तरी ते सुखमय आहे असेच म्हणत रहा.

सिद्धार्थ : (प्रवेशून) छंदा! का असा उदास उभा आहेस?

छंद : उदास नाही महाराज, ह्या उद्यानात पडलेल्या ह्या चांदण्यांची ही अपूर्व शोभा पहात असता तल्लीन झालो आहे. आपली वाटच पहात होतो. ही चैत्राची पौर्णिमा. ह्या सुंदर सरोवरात आकाश पहा कसे प्रतिबिंबित होत आहे! आणि त्यात पडलेले चंद्राचे बिंब तर इतके स्पष्ट दिसत आहे की एखाद्या मुलास ते अचानक दाखविले तर त्याला वाटेल की, ह्या सरोवराखाली खरोखरच एक दुसरे आकाश आहे, आणि त्यात असलेल्या दुसऱ्या चंद्राचा आपणच नवीन शोध लावला आहे!

सिद्धार्थ : मग त्या मुलाची ती समजूत खोटी होईल की काय? ह्या जलाशयात बिंबित झालेले हे सुरम्य आकाश इत्यादी खोटे म्हणशील तर मग वर हे वायुच्या परिसरात प्रतिबिंबित झालेले आकाश तरी खरे कशावरून? दोन्हीही दृग्प्रत्ययच! दृष्टी बंधनाचे खेळ.

छंद : पण हे जलाशयातील खालचे प्रतिबिंबित आकाश क्षणिक आहे. दिसते पण टिकत नाही!

सिद्धार्थ : आणि हे वरचे आकाश? छंदा! तेही तितकेच क्षणिक दिसणारे, पण टिकणारे नाही. तो तारा पहा, हे तीन शब्द मी तुला सांगतो न सांगतो तो तो तारा होता, तेथून लक्ष योजने पुढे गेला! त्या मानाने तारांगणातील परस्पर आकर्षणात विलक्षण पालट झाला! त्या पालटाच्या

प्रमाणात ह्या सर्व ताऱ्यांची, आकाशाची, तुझी, माझी, वाऱ्याच्या झुळकेची परिस्थिती, परिणाम आणि प्रमाण पालटून गेले. एका ताऱ्याच्या वेगाने हा पालट, तर ह्या अनंत अणुरेणूंच्या परस्पर आकर्षण, उत्सारण करणाऱ्या ह्या ब्रह्मांडातील महान स्तंभनाच्या अखंड वेगाचे परिणाम काय सांगावे? गेल्या विपलात पाहिलेले आकाश ह्या विपली तेच राहिलेले नाही. न ते तरि न तो चंद्र, न तू, न मी! त्या जलाशयातील चंद्रबिबाप्रमाणेच हे सर्व वस्तुजात सारखे पालटणारे. अनित्य! दिसणारे, पण न टिकणारे! अतएव सारखेच खोटे किवा खरे आहे! होय ना?

छंद : होय कुमार! (स्वगत - अरेरे, 'होय' म्हणायचे नव्हते इथे!) बरे, पण महाराज, ते काही असले तरी, ज्योत्स्नामयी शांत, सुंदर आणि सुखद रात्री पहाताच मनाला जो आनंद होतो; तो तरी अनुभवसिद्ध आहे ना? हे पहा!! ह्या आम्रवृक्षावर जे पक्षी रहातात ना? आज संध्यासमयी त्यांची जोडपी, चांदणी पडेतोपर्यंत, आपआपल्या घरट्यांच्या सज्जांवर गोडगोड गाणी गात बसली होती - इतकी गोड की ती गाता गाता त्यांची त्यांनाच नींद येऊ लागली. आता झोपेत त्यांना ह्या प्रसन्न जलाशयाची, ह्या चांदण्याची, ह्या फुलांच्या सुगंधांची सुखद स्वप्ने पडत असतील!

सिद्धार्थ : त्या पाखरांना झोपेत स्वप्ने पडत असतील वा नसतील; परंतु छंदा तुला तरी जागेपणीच स्वप्ने पडत आहेत खरी! ही ज्योत्स्नामयी शांत, सुखद रात्र पहा; म्हणून तू म्हणतोस. पण त्या त्या पलीकडच्या अरण्याला जाऊन विचार बरे! ते शांत आहे की अशांत ते! तो सिंह, तो वाघ, ते लांडगे आपल्या गुहेतून भुकेच्या अक्राळ विक्राळ जांभया देत आत्ताच बाहेर पडत असतील आणि त्यांच्या त्या क्रूर गर्जना ऐकताच, आपआपले प्राण कसे वाचतील, ह्या भयाने मृग, महिष, गायगुरे थरथर कापत राहिली असतील. जिकडे तिकडे रक्ताळ झुंजी सुरू होऊन शेकडो नरडी तुटत असतील! कुठे वाटमाऱ्यांनी प्रवासी धनिकांवर, त्यांच्या माना दाबून धरल्या असतील आणि त्या धनिकांची बायका, मुले चळचळ कापत दया करा, त्यांना सोडा म्हणून म्हणताच त्यांनाही ह्याचवेळी सुऱ्यांनी भोसकले जात असेल. तो बघ दूरचा वणवा. हे उभे वन जळत आहे, आणि चंद्राला अंगाई गीते गात निजलेली ती तू मघा म्हणालास तशी पाखरे अकस्मात् पोळून होरपळून चीची करीत आगीत टपटप गळून पडत असतील. ह्या तू म्हणतोस त्या, शांत चांदण्या रात्री, हे सुखाचे नाटक तू पहातो आहेस. ह्याच वेळी त्या जगात कोणास मृत्यूचा घोर लागला असेल. कोणी प्रसूति वेदनांनी विव्हळत असेल. कोणी तापाने फणफणत असेल. कोठे स्मशानात प्रेते जळत असतील! आप्त स्वकीय, ढसढसा रडत असतीलच! हे खोटे आहे का?

छंद : नाही महाराज! (स्वगत - अरे इथे नाही म्हणायचे नव्हते. मघाशी चुकून 'होय' निघून गेला आणि आता चुकून 'नाही' म्हणून निघून गेला!) पण कुमार! तिकडे काही झाले तरी येथे निदान तुम्हांला आणि मला तरी ह्या विलासभवनाच्या ह्या निर्भय उपवनातील ही सुंदर चांदणी रात्र शांत, सुखद आणि मनोरम झालेली आहेच आहे.

सिद्धार्थ : छंदा! वास्तविकतः जोवर ह्या जगात शेकडो प्राणी दुःखात तळमळत आहेत; तोवर मला काहीच सुखद वाटणार नाही! पण स्वतःपुरते पाहिले तरी ह्याच वेळी आणि इथेच, तीन भयंकर भुते तुझ्या तिन्ही बाजूंनी अकस्मात येऊन तुला खाऊ लागली तर तुला हे चांदणे आणि हे उपवन ह्या वेळीही शांत, सुखद आणि निर्भय वाटेल का?

छंद : मुळीच नाही! पण - पण पण कुमार अशा भर रात्री भयंकर भुताबितांची नावे अशी काढू नयेत!

सिद्धार्थ : नावे कसली! ही बघ भुतांची प्रत्यक्ष रूपेच उभी आहेत. ते कोण ओळखलेस? हे रोगाचे भूत पहा! त्याच्या हातापायातून सडलेल्या मांसाचे गोळे आणि रक्ताचे थेंब गळत आहेत. त्याचे तोंड वाकडे होऊन मुखातून पू वहात आहे. त्यांच्या अंगास ठणका लागला आहे. पोटात भयंकर कळा येत आहेत. बघ ते किती व्याकुळ किकाळ्या फोडीत आहे! किती केविलवाणे कण्हत आहे! छंदा! हे रोगाचे भूत तुला किवा मला केव्हा पछाडील ह्याचा काही नियम आहे का? डोळ्यांचे सुजणे, नाकाचे दुखणे, कानाचे ठणके, अंगावर जितके केस, तितक्या गणिक, रोग आहेत! कारण, प्रत्येक केसामागे निदान एकएक केसतूड तरी असतोच! कण्ह, ठणका, शिणका, आग, कळा, शोष, दाह, घोर - अरेरे! भयंकर रोगांच्या ह्या अनंत यातनांची असिलता, मनुष्यमात्राच्या डोक्यावर सारखी टांगलेली आहे. ते बघ! इकडे हे दुसरे भयंकर भूत, हे वार्धक्य! ही पिडा! दात पडलेले, डोळे चिपडलेले, नाक वहात आहे, लाळ गळत आहे, पाय लटपटत आहेत, ओंगळ अभद्र, किळसवाणी हिडीस! ही पिडा (म्हातारपण) तुझी आणि माझी एक दिवस अशीच दशा करणार! अंथरुणावर आपल्याच मलमूत्रात लोळत पडलेल्या आम्हास पाहून आपले आप्त दूर पळतील. ममतेची मुलेमाणसेही कंटाळून म्हणतील, देवा! ह्यांची माती एकदा उचलावी! आणि आता हे तिसरे भयंकर भूत पहा! पहा! ते तुझ्या माझ्यावर झडप घालण्यास कसे अगदी टपून राहिले आहे. कोळशासारखे काळेकुट्ट तोंड, डोळे पांढरेफटक वटारलेले, जीभ, काटा मोडून बाहेर लोंबकळत पडलेली! हे मृत्यूचे भूत! मरण! छंदा! परवा राजधानीत तूच मला सांगितलेस ना? की

आज ना उद्या आपण सगळे ह्या मरणाचे तिरडीवर बांधले जाणार म्हणून! हाय हाय! जन्म, जरा, व्याधी मरण! ही उद्यानातील उग्र श्वापदे मनुष्यमात्राच्या सदोदित मागे लागलेली असताना छंदा, कसले विलास भवन, कसले चांदणे, कसली शांती, कसले सुख? अहो! त्या दुःखमय जगातील दुःखापासून सुटण्याचा मार्ग मला कोणी दाखवील का हो? तसा मार्ग आहे तरी का? ह्याचा निकाल मला एकदा लावलाच पाहिजे. महादुःखापासून जगाची मुक्तता करण्याचा तो मार्ग शोधण्यासाठी मी माझे तारुण्य, माझे राज्य, माझा पिता, माझा पुत्र, माझी पत्नी, माझे सर्वस्व, माझे प्राणसुद्धा अर्पण करणार. आज मी संसारास रामराम ठोकून गुप्तपणे चालता होणार! नाहीतर उद्या महाराज शुद्धोदन मला पुन्हा अडथळा करतील. छंदा! जा, तू माझा घोडा सज्ज करून घेऊन ये, जा. ह्या विलास भवनास मी सोडू नये म्हणून माझ्या पित्याने ठेवलेले हे पहारेकरी सुदैवाने निद्रित आहेत; तोच मला निसटले पाहिजे.

छंद : पण राजकुमार!

सिद्धार्थ : न पण, न परंतु; छंदा! दुःखाग्नीने वणव्यासारख्या पेटलेल्या ह्या संसारात आता मला क्षणभर राहणे नाही. जन्म, व्याधी, जरा, मरण ह्या कधीही कोणासही न टाळता येणाऱ्या सांसारिक महादुःखानी कोणता शहाणा उद्विग्न होणार नाही? आणि छंदा, तू शहाणा आहेस ना?

छंद : होय महाराज!

सिद्धार्थ : तर मग जा कसा आणि घोडा घेऊन ये! मी एकदा यशोधरेला स्वतः पाहून, शेवटची भेट देऊन येथेच येतो! जा, जा, घोडा घेऊन ये. हा मी आलोच!!

**अंक पहिला प्रवेश तिसरा**

(यशोधरेचे अंतःपुर. मंचकावर यशोधरा, मंजुळा आदिक निजल्या आहेत!)

सिद्धार्थ : (प्रवेशून) अहाहा! ह्या भौतिक चर्मचक्षूस हे सौंदर्याचे अनुपम दृश्य किती मोहक भासत आहे. लहानपणी मला संसाराचा कंटाळा यावा आणि श्रमण संन्याशांच्या मागे मागे मी जावे ते पाहून घाबरलेल्या माझ्या पित्याने मला संसारातच गुंतवून ठेवण्यासाठी जे सोनेरी परम आकर्षक असे मदन मंत्राने भारलेले इंद्रजाल टाकले ते हेच! शाक्य कुलातीलच नव्हेत, तर दूरवरून नाना सुंदर ललनांना आणून माझ्या मनाचे रंजन करण्यासाठी ह्या विलास भवनात ठेवले. लावण्याचे हे किती प्रकार! परोपरीचे सौंदर्य! ही गौरी, किती सुवर्णासारखी, हेमगौर अंगलता पहा! झोपेत पदर कमरेखाली सरकला आहे. हातावर, वदन जसे नालावर लवलेले कमल. ही सुधा, हिचे हे शामल मुख मंडल; किती मोहक ठेवण! ही आणि इतकी लुसलुशीत कांती की तिच्या ह्या शामल लावण्यापुढे नुसत्या पांढऱ्या फटक गोरेपणाचे तोंड अगदी गोरेमोरे व्हावे. सारंगी वाजविता वाजविता ही तशीच मंचकावर टेकून झोपी गेली. सारंगीलाही झोप लागावी तशी निःस्तब्धपणे तिच्या अंगाशी लगटून आहे. सुधेच्या स्वप्नातील गाण्यास सारंगीच्या स्वप्नातील सूर साथ देत असावेत, अशा दोघींच्या झोपा एकतान झालेल्या दिसत आहेत. ही चित्रा! वा! कुशीवर आटोपशीरपणे निजली असता तिची ही तरतरीत अंगलता खरोखरच एखाद्या मनोहर चित्रासारखी रेखीव दिसत आहे! ही मोहना! आणि ही मधुरा! ह्या एकवट निजल्या असताना त्यांच्या त्या मनोज्ञ एकवट अंगावर ती त्यांची दोन मुखमंडले मात्र शेजारी शेजारी भिन्नपणे शोभत आहेत, जशी एका देठाला उमललेली दोन जुळी कमले! आणि ही माझी पट्टराणी! माझी प्रियतमा! माझी यशोधरा! गाढ झोप लागली वाटते. मंदमंद कालबद्ध श्वास देता घेता किंचित वर खाली होणारे तिचे वक्षस्थलावरील हे हार! ही तिची ढिली झालेली वेणी, त्या वेणीच्या ढिलाईमुळे काही चुकार कुंतल निसटून तिच्या वदनाभवती लुब्धपणे उडत आहेत, आणि ह्या सगळ्या ललना मिळून झालेल्या ह्या एकंदर दृश्याची मोहकता तर केवळ मादकताच आहे! संगमरवरी भूमीवर रत्नमाणिकांचा हार तुटून ओघळावा; किवा दोघी लडिवाळ किशोरींच्या दांडगाईत एखादा रंगीबेरंगी गुलाबांच्या फुलांनी भरलेला भला मोठा हारा, उपडा पडून त्यातील फुलांच्या पाकळ्या इतस्ततः विखरून टाकल्या जाव्यात, तशा फुलांच्या विखरून पडलेल्या पाकळ्यांसारख्या ह्या पहुडलेल्या सुंदरींनी हे स्थल अतिशय लोभनीय दिसत आहे! ह्या सगळ्यांनी माझ्यावर किती लोभ केला! ह्यांच्यावर मीहि किती लोभ केला; ह्यांच्यासमवेत किती विलास, किती विहार केले! मनाचे प्याले

भरून भरून मी ह्या लावण्याच्या उद्यानातील, फुलांफुलांतील मधुर मधु आकंठ प्यालो. परंतु आज मी ह्या सर्वांना सोडून जाणार! ह्या कामिनी, हे कामासव, ह्या कामीकाया, ह्या सर्व कमनीय वस्तूंस, विषवत् समजून त्यांचा परित्याग करण्यास हा सिद्धार्थ सिद्ध झालेला आहे, ही गोष्ट माझ्या मनास स्पष्टपणे समजावी; म्हणूनच मी येथे हेतुतः आलो आहे. मना! तुझ्या परीक्षेचा हाच खरा निकष आहे! ह्या अत्यंत मोहक कामिनींच्या, अनुलंघ्य आकर्षणाचे असे मधे उभे राहून मग इत्यादी तू त्यास उल्लंघून निघून जाऊ शकशील, तरच तुझे वैराग्यबल खरे ठरेल! भौतिक नेत्रास हे सुरम्य रमणींचे शय्या मंदिर किती कमनीय दिसत आहे! ते मना! मी तुला आत्ताच सांगितले. पण आता एक आत्मिक उपनेत्र माझ्यापाशी आहेत; तेही तू एकदा लावून हेच दृश्य पहा! त्या दिवशी जो एक श्रमण परिव्राजक साधु मला अचानक भेटला; त्याने हे मानवाचे खरे स्वरूप दाखविणारे तात्विक उपनेत्र मला गुप्तपणे दिले आहेत. ह्याला नर-कपाल म्हणतात. हा मनुष्याच्या तोंडाच्या हाडकांचा सापळा आहे. दिखाऊ बाहुलीच्या आतील ही पटल चिध्यांची एक गुंडी आहे. अहो केवढे आश्चर्य! हे तात्विक उपनेत्र मनाचे डोळ्यास लावून बघताच हे विलासभुवन अकस्मात् एका भयानक स्मशानात रूपांतरीत झाले की! काय? ह्या सर्व रमणीय मुखमंडळांची शेवटी ह्या नर-कपालासारखी अवस्था होणार? नव्हे! ह्यांची मूळ अवस्था हीच असून ह्या अत्यंत हिडीस हाडकी सापळ्यावर चढविलेले सौंदर्य हे केवळ क्षणाचे सोंग आहे. नाक वर करून मिरविणाऱ्या नाकाचे हेच ना मूळ राहते! एक ना एक दिवस अगदी पाहता पाहता असे थोबाड होणारच! पहाणाऱ्या डोळ्यांच्या आंधळ्या खाचा, गोंडस गालांची अपूर्ण भयानक भुयारे! अरे स्त्री देहा! अरे नरदेहा! रोगांनी पोखरलेल्या, घाणींनी भरलेल्या, दुर्गंधांनी परिसरलेल्या, तुझी मला असह्य शिसारी येत आहे. ही पहा झोपेत दात कचकच खात आहे; ती पहा! जीभ लळलळत ठेवून उताणी पसरली आहे, गळत्या लाळेने भरली आहे. ती अजागळासारखी बिभत्सपणे आ वासून घोरते आहे; आणि अरेरे! हिचा कोण हा दुर्गंध! कोण ही घाण! हाय हाय! ज्या ललनास अशा अस्ताव्यस्त निजलेल्या पाहून त्यांच्या दर्शनाने मला कामज्वर चढून मी मोहित होई; त्याच का ह्या स्त्रिया! हा वैराग्याचा मंत्रमणी, हा तत्वाचा ताईत, हे विवेकाचे उपनेत्र लावून पहाताच माझी विषयनिरोहित दृष्टी स्वच्छ होऊन मला हे विलासभवन म्हणजे प्रत्यक्ष नरक-भवनासमान ओंगळ, दिसू लागले! कामोन्मादात जेव्हा ह्या ललनांच्या आलिंगनास कोणी स्वर्गवास म्हणतात; तेव्हा ते फार तर लाक्षणिकतःच सत्य असते; पण जेव्हा मी ह्या ओंगळ, आतून बाहेरून घाणीने आणि घामाने किळसवाण्या असलेल्या देहास, देहाने लगटणे म्हणजे नरकवास म्हणतो. तेव्हा ते अक्षरशः सत्य आहे. आता येथे माझे मन क्षणभरदेखील रमू शकत नाही. ह्या दुर्दैवी स्त्रियांवर

किवा यशोधरे! तुझ्यावर माझी प्रीती कमी झाली म्हणून नव्हे तर तुमच्यावर खरी प्रीति अशी आजच मी करू लागलो म्हणून! म्हणूनच मी तुम्हाला टाकून जातो! कारण यशोधरे! आजवर तुझ्या तारुण्याचे हे वरचे मोहकत्व माझ्या यौवनास मोही म्हणून मी तुजवर प्रेम करी. पण जरा तुझ्या माझ्या यौवनास जळूसारखी सारखी शोषीत आहे! जेव्हा हे डोळे पिचके आणि चिपडलेले होतील; ह्या तोंडाचे बोळके होईल; कंबर वाकून कुबड निघेल; अंगातोंडावर सुरकुत्यांचे जाळे पसरेल तेव्हा तुझे, माझे हे विषयासक्त प्रेम नाहीसे होईल. जरी नवनवीन नौयौवना स्त्रिया सेवेस येत गेल्या तरी जेव्हा जरा, माझी भोगेच्छाच हिरावून नेईल; तेव्हा काय? तुमची कमनीयता आणि माझी कामेच्छा. दोन्ही नष्ट होताच; विषयी प्रेमाचे आकर्षण संपताच, चोखून टाकलेल्या चोथ्यासारखे आपण एकमेकांपासून दूर फेकले जाऊ. विषयी प्रेमातून, वियोगच नव्हे, तर विरसही होणारच! पण ह्या दुर्गतीच्या विचाराने आज मला जी तुमची, माझी आणि सर्व जगाची दया येत आहे; आणि मला, तुम्हाला आणि सर्व प्राणिमात्रांना ह्या जन्म, व्याधी, जरा, मृत्यूच्या भयानक संकटातून सोडविण्यासाठी जो महत्तम प्रयत्न करण्याचा, संकल्प करीत आहे. तेच माझे तुमच्यावरील खरे प्रेम; तोच तुमचा - माझा खरा स्नेह! देवी यशोधरे! येतो आता! आजपर्यंतच्या तुझ्या प्रेमाची ही पावती घे. (चुंबन घेण्यास जातो.) नको! ही उठेल! आणि माझ्या वनप्रस्थानात अडथळा आणील. पण निदान बाळा! तुला आमच्यापासून पित्याचे सुख लाभणे नाही. तुझे माझ्याकडे येणे, दैवाचे हाती! तथापि, पित्याच्या चुंबनावर असलेला तुझा औरस अधिकार मी अगदीच बुडवीत नाही. हा पहिला आणि शेवटचा मुका घेतो. ह्यातच सर्व काही मानून घे! (मुलास चुंबितो) आणि शेवटी प्रीतिदेवते! यशोधरे! ज्या तुझ्या ह्या रतिशेजेला, माझा स्पर्श, पुन्हा कधीही होणार नाही; तिला हा मी शेवटचा स्पर्श करून आणि देवस्थानासारखी प्रदक्षिणा घालून येतो आता! माझ्या महाभिनिष्क्रमणाचा शुभ क्षण जवळ आला. मी आताच्या आता घोडा भरधाव सोडून वनवासात निघून जाणार!

**अंक पहिला प्रवेश चौथा**

(छंद आणि सिद्धार्थ, अश्व कंटकास थोपटीत आहेत.)

छंद : राजकुमार सर्व रात्रभर एका मांडीने हा घोड्यावरचा प्रवास केल्यामुळे आपल्याला आता फार थकवा आला असेल! आता आपण शाक्य राज्याची सीमा ओलांडून मगधाचा राजा बिंबिसार ह्याचे राज्यात प्रवेश केला असल्याने शुद्धोधन महाराजांचे दूत आपणास परत नेण्यास येण्याचे भय उरले नाही. तरी आता सिद्धार्थांनी ह्या शिलातलावर काही काळ विसावा घ्यावा.

सिद्धार्थ : मी दमलोच; पण माझ्या धावत्या अश्वामागे पायी पळत असता छंदा तू किती दमला असशील! त्याचप्रमाणे हा माझा विश्वासू अश्व कंटक किती श्रमल्यागत दिसत आहे! माझ्या एकनिष्ठ सेवका छंदा! हे घे, तुझ्या ह्या अपूर्व सहाय्याचे अल्पसे पारितोषिक! (रत्नकंकण अर्पण करतो.)

छंद : नको महाराज! खरोखरच नको! आपण निष्ठेचे नाव काढल्यामुळे तर मला हे पारितोषिक स्वीकारण्यास अधिकच संकोच वाटत आहे. कारण, आपल्या ह्या राजत्यागावर आणि वनगमनावर माझी निष्ठा होती; म्हणून मी आलो असे मुळीच नसून आपल्या ह्या साहसाच्या उचिततेविषयी माझी निष्ठा अगदी मावळली असताही मला मागे राहवेना म्हणून मी बरोबर आलो. मार्गात परत फिरण्याचा मी सारखा निश्चय करीत होतो. पण सारखा पुढे धावत होतो. मी धावत सुटावे; असे वाटून थांबलो नाही असे नसून थांबावे असे सारखे वाटत असताही धावत सुटलो. आपले चरणांचे आणि वचनांचे आकर्षणच असे काही विलक्षण आहे. आताच पहा! आपली ही रत्नजडित कंकणे मला खरोखर घ्यावीशी वाटत नाहीत. पण आपण घे म्हणताच, हे पहा! माझे हात ती घेण्यास पुढे पसरले जातात! नको महाराज! मला ती अगदी नकोत! (कंकणे घेतो.)

सिद्धार्थ : छंदा, आता आम्ही ह्या घोर वनात एकटे शिरणार. आता तू परत राजधानीस जा. भिऊ नकोस. शुद्धोधन महाराजांस आणि माझी प्रिया यशोधरा ह्या दोघांस तू हा माझा निरोप घेऊन जा; म्हणजे ते माझा पत्ता तरी लावून दिला म्हणून तू मला वनवासात जाण्यास साहाय्य दिले, त्याविषयीचा तुजवरचा रोष विसरून जातील. त्यांना सांग की ज्या दिवशी आपला आणि माझा संयोग झाला, त्याच दिवशी आपल्या वियोगाचे बीज पेरले गेले. मी तुम्हांस सोडून गेलो नसतो तर मग मात्र तुम्ही आणि मी नित्य एकत्रच राहिलो असतो असे थोडेच आहे? केव्हातरी

आपणास एकमेकांचा शेवटचा निरोप घ्यावाच लागता. मृत्यूच्या पडद्याआड मी प्रथम गेलो तरी आपणास माझा शेवटचा निरोप घ्यावाच लागणार! तेव्हा ह्या अवश्यंभावी गोष्टीचा शोक करू नये! मी जन्मलो तेव्हा मी दिग्विजयी होणार, असे ज्योतिषी म्हणाले. क्षात्ररीतीनुसार लक्ष लक्ष सेनेनिशी दिग्विजयावर निघालो असतो तर आपण मला मोठ्या गौरवाने आणि आनंदाने निरोप दिला असता. मग तसा आजही का देत नाही? कारण आज मी त्या सहस्त्रावधी मनुष्यांच्या रक्तपाताने रंजित झालेल्या दुष्ट शस्त्र दिग्विजयापेक्षा अत्यंत श्लाघ्य आणि शुभकारक अशा एका महान शांती दिग्विजयावर निघालो आहे. मी दुःखाचे मूळ शोधून मनुष्यमात्रास अखिल क्लेशांपासून मुक्त करण्यासाठी मरणावरच मोहीम करणार! तेव्हा आपण मला त्या कार्यी यशच चिंतावे.

छंद : महाराज! हा अत्युदार संदेश शुद्धोधन महाराजांसारख्या विवेकशील क्षत्रिय वृद्धाचे क्वचित समाधान करील. पण देवी यशोधरेचे समाधान त्याने कसे होईल? तिच्या भर तारुण्याची आज माती होणार आहे!

सिद्धार्थ : हाय! हाय! खरोखरच आज आता तिकडे देवी यशोधरा पलंगावर जागृत होऊन प्रत्यहीच्या सवयीप्रमाणे मला शेजारी चाचपून पाहील आणि मी नसल्यामुळे तिचा तो माझे अंगावर टाकण्यासाठी उचललेला हात धपकन रिकाम्या शय्येवर पडेल तेव्हा मी नाही म्हणून तिच्या हृदयास जो धक्का बसेल; त्याच्या वेदना मला आताही होत आहेत! लोककल्याणासाठी मी केलेल्या कोणत्याही त्यागापेक्षा हा प्रीतित्यागच अत्यंत कठीण; म्हणूनच अत्यंत श्रेष्ठ त्याग होय! पण यशोधरे! पण मी वनात न जाता तुझ्या मंदिरात तुला प्रेमाची घट्ट मिठी मारून राहिलो तरीही तुझ्या तारुण्याचे आणि सौंदर्याचे हे सोनेरी नग नि नग माझ्या, त्या मिठीच्या कंजुष मुठीतून हा कालचोर हडसावून नेणारच नेणार! यशोधरे! तुझे तारुण्य गळक्या पात्रासारखे सारखे झरत आहे! म्हणून तुझी आणि माझी आणि जगाची ह्या दुःखातून नित्याची सुटका करावी म्हणून म्हणजे तुझ्याच चिरंतन कल्याणासाठी मी तुला आज सोडीत आहे. छंदा! हा माझा निरोप, तू घे आणि आता परत जा! (आपला मुकुट काढीत) आणि हे मुकुटा तूही जा! तुझा भार ह्या माझ्या मस्तकावरून दूर केल्यावाचून जगाच्या कल्याणाचा भार वाहण्यास तेथे जागा कशी मिळणार? लहानपणापासून जेव्हा जेव्हा मी दरिद्री आणि कष्टाळू शेतकऱ्यास घामाने चिंब झालेला पाही आणि राजाच्या धनाशेसाठी युद्धात घायाळ झालेले सैनिकही पाही, तेव्हा तेव्हा मला ह्या राजमुकुटाची शिसारी येई. वाटे; ह्या राजमुकुटातील प्रत्येक ऐदी पाचूत, लालात आणि

रत्नात जे तेज चमकते आहे; ते त्याचे नसून ह्या कष्टाळू शेतकऱ्यांच्या आणि घायाळ सैनिकांच्या घामाच्या आणि रक्ताच्या थेंबाथेंबाची ती भयानक प्रतिबिबे आहेत. राजांची तृष्णा ही एकदम राक्षसासारखी ह्या कष्टाळू श्रमिकांच्या रक्तास पीत असते आणि हा मुकुट, त्या रक्तपी राजपिपासेच्या हातातील, रक्त पिण्याचा पेला असतो! हे मुकुटा तुझ्यातील रत्नांच्या संख्येइतक्याच निर्मल पाण्याच्या थेंबांनी भरलेला हा कमंडलू आणि धान्याच्या दाण्यांनी भरलेली ही ओंजळ तुझ्याहून अधिक उपयुक्त आहे, कारण ते हीनदीन तहानेल्याला पिता येईल; भुकेल्याला खाता येईल; पण मानवाची तहानभूक भागविण्यास निरुपयोगी असलेल्या चमकदार गारगोट्यांनो! रत्ने म्हणून तुम्हाला ज्या मूर्ख माणसांनी उकिरड्यावरून गोळा करून मोठे केले; त्या उकिरड्यावरच पडा! जा! (मुकुट फेकून देतो) आणि हे भरजरी कपड्यांनो! तुम्हीही जा! (वस्त्रे फेकतो) छंदा! आता मला किती हलके वाटत आहे! निर्धन बापड्यास पाहून आजवर मला जी दया येई; ती लबाड होती. कारण भुकेल्यांसाठी, उघड्यांसाठी तोच खऱ्या दुःखाने तळमळू शकेल, की जो स्वतः उघडा आहे. भुकेला भिकारी झाल्यामुळे त्यांच्या दुःखाची दया करण्याची खरी पात्रता मला आली आणि केवढे आश्चर्य! की त्या विलासी सुखाचा त्याग करताच, त्यागाचे विलासी सुख मला लाभले! एक घोट पाणी, एक घास अन्न आणि अनंत आनंद! (पडद्यात पाहून) कोण जाते आहे, ते भगवे वस्त्र घालून! तो ते वस्त्र मला देईल का?

छंद : अहो अहो गृहस्थ - (व्याध प्रवेशून तसाच जात असता छंद त्याला अडवून पुढे म्हणतो) आम्ही तुम्हांस हाक मारीत आहो.

व्याध : तर मग तुम्ही चुकता आहा; कारण मी गृहस्थ नसून वनस्थ आहे.

सिद्धार्थ : हे सज्जना.

व्याध : तुम्हीही चुकता आहात; कारण मी सज्जन नसून दुर्जन आहे. सोडा मला, मी व्याध आहे महाराज!

सिद्धार्थ : पण मीही आता महाराज राहिलो नाही. म्हणून विनंती करतो की, ही तुझी भगवी वस्त्रे मला देशील का?

व्याध : मुळीच देणार नाही. ह्या वस्त्रांमुळे मी न दिसून मृग असावध असता त्यास चटकन मारू शकतो; आणि तुम्ही ही वस्त्रे घालून इत्यादी व्याधाचाच धंदा करणार असाल; तर

ही वस्त्रे तुम्हाला देऊन मी आपल्या हाताने स्वतःच्या धंद्यात एक प्रतिस्पर्धी उत्पन्न करून घेण्यास कोणी भाबडा संन्यासी किवा बैरागी नाही.

सिद्धार्थ : त्याची तुला भीति नको. कारण मीही एकपरी व्याधाचाच धंदा करणार आहे; तरीही त्याचा, तुझ्या धंद्याशी संबंध नाही. तुझा धंदा मृगास मारणे. मरणासच मारण्याचा धंदा करणार आहे मी! ही भगवी वस्त्रे व्याधास आणि विरक्तास सारखीच उपयोगी आहेत. कारण ती घातल्याने मृगाप्रमाणे मरणही असावधपणे पारध्याच्या आटोक्यात येईल. दे ती वस्त्रे मला आणि त्याचे मूल्य म्हणून ही घे राजविलासाची भरजरी वसने तुला! आणि हे अलंकारहि घे!

व्याध : (लालची पण शंकित दृष्टीने पहात - स्वगत) चोरून तर आणले नाही ना? कोणाचे तरी हे याने सारे? नाही तर स्मशानातील ह्या माझ्या चिध्यांच्या बदली भरजरी वस्त्रे कोणता गाढव देणार आहे?

छंद : वेड्या व्याधा, बिचकू नकोस! हे एक फार मोठे धनाढ्य गृहस्थ असताही प्रबुद्ध होण्यासाठी संन्यास घेऊ इच्छित आहेत; म्हणून तुला ही अमूल्य संधी आली आहे. व्याधाचा आणि प्रबुद्धाचा असा सौदा सहस्त्रावधी वर्षांनी केव्हा तरी होत असावा!

व्याध : (स्वगत) मी समजत होतो तो शाक्यांचा राजपुत्रच काय तो असा गायपारखी आहे; पण आता असे दिसते की, अशा भ्रमिष्टांचीही एक जातच्या जात असावी ह्या जगात!

(उघड) - बरे तर! द्या ती वस्त्रे नि ते अलंकार आणि चला चार पावले पुढे. त्या उकिरड्यावर आणखी काही चिंध्या आहेत, त्याच रंगाच्या. त्या किवा ह्या, किवा सगळ्याच घ्या जमतील तशा. (सिद्धार्थ आणि व्याध आत जाऊन वस्त्रे पालटून येतात. छंद पहातच रहातो.)

छंद : पण ह्या भरजरी वस्त्रांमुळे मृग तुला फसणार नाहीत.

व्याध : अशी वस्त्रे आणि अलंकार मिळाल्यानंतर मृगामागे धावायचे कशाला! अरे! पाचशे ससे म्हणजे एक रानडुक्कर! आणि पाचशे रानडुकरे म्हणजे हे एक असे रत्न. ते मिळाले; म्हणजे रानडुकरामागे धावत फिरण्याइतका, निर्बुद्ध असा मी कोणी रानडुक्कर आहे की काय? बरे येतो आता. (जातो - परत येतो आणि म्हणतो) आणि असे पहा! ही सर्व विकून झाली; की दहा-पंधरा वर्षांनी मी पुन्हा येथे येईन. व्याधाचा व्यवसाय चालू करीन. तेव्हा पुन्हा आपणही नवी राजवस्त्रे

नि अलंकार घालून पुन्हा येथे यावे. ओळख ठेवावी; आणि असा वस्त्र विनिमय वारंवार करीत राहू आपण! (व्याध निघून जातो.)

सिद्धार्थ : झाले! माझ्याजवळ असलेल्या माझ्या स्वार्थाची चिंधी नि चिंधी फेकली गेली! आज मला मी मेलो! आणि ह्या माझ्या प्रेताने हे प्रेत पहात रहावे! सकल दुःखाचे मूळ शोधून त्याचा उच्छेद करून अवघ्या प्राणी मात्रास दुःखमुक्त करण्यासाठी मी आज जो हा पाय; पुढे टाकीत आहे; तो यश आल्यावाचून मागे घेणार नाही. निदान त्या कार्यी मानवी प्रयत्नांची पराकाष्ठा केल्यावाचून तरी मी रहाणार नाहीच नाही. अशी, हे देवहो, तुम्हां समक्ष प्रतिज्ञा करून हा सिद्धार्थ, आपला अर्थ सिद्ध करण्यासाठी हे महाभिनिष्क्रमण करीत आहे.

(वनात जातो - पडदा पडतो.)

**अंक पहिला प्रवेश सहावा**

(यशोधरेचे शयनमंदिर)

मधुरा : सखे! शेवटी सिद्धार्थ कपिलवस्तूस परत न येता परिव्राजक होऊन निघून गेले ना? छंदाने त्यांचा संदेश आणल्यानंतर शोकाकुल शुद्धोधन महाराजांनी प्रधानजीस भार्गवाश्रमात सिद्धार्थांना बोलवायला पाठविले; पण ते विफलमनस्क होऊन आले. आता सर्व आशा सुटल्या.

यशोधरा : (स्फुंदून) मधुरे! सर्व आशा खुंटल्या. आपल्या यौवनाच्या अंकाचा आरंभ तशा स्वयंवरात होऊन तयाचा अंत अशा स्वयंत्यागात झाला! माझ्या प्राप्तीसाठी प्रेमाच्या पहिल्या भरात सिद्धार्थांनी त्या शस्त्रस्पर्धेत स्वतःचा जीव धोक्यात घालून मला जितक्या उत्कटतेने वरले; तितक्याच उत्कटतेने आज ते प्रेम ओसरताच त्यांनी माझा त्याग करून माझा जीव धोक्यात घातला. काममुग्ध युवतींनो, ज्याला तुम्ही प्रेम प्रेम म्हणून म्हणता; ते असे चंचल असते! हे ध्यानात धरूनच त्याचा अवलंब केलात, तर पुढे अशी फसगत तरी होणार नाही! हं, चला मुलींनो! ह्या जीवन नाटकातील राणी यशोधरेचा प्रवेश संपला. आता ती राणी म्हणून जगाच्या रंगभूमीवर पुन्हा येणार नाही. म्हणून हे माझ्या होऊन गेलेल्या प्रवेशातील शय्यामंदिराचे दृश्य, देखावे, पालटा. त्या सतारींना, सारंग्यांना आणि जलतरंगांना म्हणावे; यशोधरेच्या आयुष्यातील प्रेम संगीत संपले. त्याचा सूर मुका झाला. दयिताच्या अनुरागासह त्या गीताचा रागही तिच्यावर रागावून बैरागी झाला!

मधुरा : सखे! अशी अगदीच हताश होऊ नकोस! सिद्धार्थांप्रमाणे पूर्वीही मोठमोठे राजे, विरक्त होऊन वनात गेले. पण साधना संपताच पुन्हा परत येऊन आपल्या प्रियकरणींसह सुखाचा संसार थाटते झाले. सिद्धार्थ, तसेच येणार नाहीत कशावरून?

यशोधरा : मधुरे, तर मग सिद्धार्थाचा स्वभाव तू ओळखला नाहीस; आणि या यशोधरेचाही नाहीस! नाटकात एकदा झालेला प्रवेश जसा पुन्हा होत नाही, भंगलेली वीणा जशी पुन्हा वाजत नाही, तशी विरस झालेल्या रतिमंदिरातून बाहेर जाणारी यशोधरा त्यात पुन्हा प्रवेशणारी नाही! ती आता व्रतस्थ होऊन त्या राजवाड्यातील देवमंदिरात प्रवेशणार आणि सिद्धार्थ जरी परत आले तरी त्यांची भेट त्या देवमंदिरात घेणार! ह्या त्यांनी तिरस्कारिलेल्या रतिमंदिरात नव्हे! म्हणून म्हणते सख्यांनो! उचला त्या उशा; गुंडाळा ती रतिशेज, घडी घाला त्या पलंगाची,

मी नेसलेल्या ह्या एका शुभ्र पातळावाचून मला आता दुसऱ्या कोणत्याही वस्त्राची आवश्यकता नाही. म्हणून ते शेले, ते शालू, ह्या साड्या तुम्ही घेऊन जा! माझ्यासारख्या ज्या विरहिणींना अश्रू गाळावयाचे आहेत; ज्यांचे प्रियकर त्यांना कंटाळून अजून दूर गेले नाहीत; त्यांना देऊन टाका आणि यशोधरेचा निरोप सांगा; की तुम्हा दयितांचे स्नेहालिंगन, जोवर प्रेममुग्ध आहे; तोवर मनाची हौस फेडून घ्या. कारण मुलींनो! प्रेमाने कवटाळणाऱ्या पुरुषांच्या हातांना कळ लागून त्यांना तुमचा केव्हा कंटाळा येईल ह्याचा काही एक नियम नाही; असा यशोधरेचा अनुभव आहे.

सर्वजणी : देवी! स्वामिनी! सखे! हे विलासभवन?

यशोधरा : छेः! छेः! ह्या विलासभनवनाची अशीच व्यवस्था पुढे चालवा. हे माझे एकटीचे शय्यामंदिर तेवढे बंद करा. पण इथे माझ्या एकटीचा तेवढा संसार मांडलेला नव्हता; वृक्ष, लता, फुले, पाखरे, मदनाचे आणि रतीचे इथे राज्य होते. माझ्या एकटीच्या रसाचा विरस झाला; म्हणूनच त्यांचा विरस होऊ देऊ नका. जगाच्या मनोरमतेत माझ्यासारखा एक दुःखी प्राणी इतकी उजाडव्यवस्था पसरून देतो तर अनेकांचे संसार उच्छिन्न झाले असता सिद्धार्थ म्हणतात तसे हे जग खरोखरच केवळ दुःखमय होईल. म्हणून मुलींनो फार जपा. वृक्षांना पाणी घाला. ते मोर, त्या संगमरवरी कुट्टिमावर पिसारे पसरून जेव्हा विसावा घेतात किवा जेव्हा त्यांचे प्रियकरणीसमोर पिसारे उभारून नाचू लागतात, तेव्हा त्यांचा विरस होऊ देऊ नका. नाहीतर तेही विरक्त होऊन जायचे एखादेवेळेस! मैनांना बुलबुलांना हंसांना सोनेरी डाळिबाचे दाणे वेळचेवेळी घालीत जा. माझ्या भुकेल्या मनापुढून माझे सुखाचे ताट जसे हिसकावले गेले; तसे त्यांचे कोणी हिसकू नका! बरे द्यावा आता निरोप मला! ज्या रतिमंदिरातील राजा नाहीसा झाला त्यातील राणीही नाहीशी झालीच पाहिजे! आटपा ते सामान! सोडा! राणी यशोधरेच्या रतिमंदिरावर शेवटचा पडदा सोडा!

(पडदा.)

**अंक दुसरा प्रवेश पहिला**

चित्रगुप्त : हे स्वामिन्! हे यमराज!

यमराज: चित्रगुप्ता! अशी कोणची महत्वाची बातमी आणली आहेस की, इतक्या आतुर त्वरेने इकडे धावलास?

चित्रगुप्त : गयाश्रमात बोधिवृक्षाखाली राजपुत्र सिद्धार्थ गौतम आपल्या चरम साधनेस बसले आहेत, तिचा परिपाक त्या समाधीत होणार आहे की जीत प्रकट होणाऱ्या महान् धर्मसत्याचे प्रभुत्व उभ्या मनुष्यजातीवर स्थापले जाण्याचा उत्कट संभव आहे. मनुष्य जातीचे कल्याण साधणाऱ्या ह्या महान् क्षणाचा परिणाम युगानुयुगांचा कायापालट करणारा आहे. ह्यासाठीच अधःपतनाच्या साऱ्या शक्तींचा स्वामी जो देवरिपु 'मार' तो वासना, तृष्णा, मोह, मत्सर प्रभृति आपल्या सर्व साथीदारांसह त्या महान् क्षणास विघ्न करण्यासाठी सिद्धार्थावर चालून जात आहे. प्रथम सामदामभेदाने सिद्धार्थ फसला तर तसे; नाही तर शेवटी दंडशक्तीने तो देवरिपु मार सिद्धार्थाचा नाश करू इच्छितो. आपण धर्मराज! ह्या धर्मशत्रू, कलिपुरुष माराचा हा पापी प्रयत्न आपण हाणून पाडालच!

यमराज: वेळेवर कळविलेस. जोवर तो देवरिपु मार, केवळ सामदामभेदाच्या आमिषांनीच सिद्धार्थास भुलवू पहात आहे; तोवर मी मध्ये पडणार नाही. कारण राजपुत्र सिद्धार्थाच्या दृढव्रताची ती एक कसोटीच आहे. पण हा पापाचारी मार सिद्धार्थाची चरम समाधि बळाने भंगू पाहील; किवा त्याचा नाश करू धजेल; तर मी स्वतः त्यास शासन करून सिद्धार्थाचे संरक्षण करीन!

**अंक दुसरा प्रवेश दुसरा**

(बोधिवृक्षाखाली सिद्धार्थ एका उच्च शिळेवर ध्यानस्थ बसले आहेत. त्यांचेभोवती झिरझिरीत शुभ्र नि दिव्य असे पटल लटकत आहे. देवरिपु मार आणि त्याची सहकारिणी वासना त्या पटलास दूर सारून आत जाण्याचा यत्न करीत आहेत.)

मार : कोण आश्चर्य हे! राजपुत्र सिद्धार्थाच्या पुढे हा त्याच्या पवित्रतेचा जो शुभ्र पडदा आहे; तो तो मला काहीही केल्या आत घुसता येत नाही - काही केल्या त्यास बाजूस सारून उल्लंघवत नाही! ह्या मर्यादेच्या निकट जाणे शक्य नाही. येथूनच त्यास उद्देशून शब्द पोचला तर पोचविला पाहिजे. (मोठ्याने हाक मारून) राजपुत्र सिद्धार्थ! तू राजकुलोत्पन्न क्षत्रिय आहेस. मी विनाशक शक्तींचा स्वामी आहे. मी देवांनाही अजेय आहे. तुझ्या तपस्येने मी प्रसन्न झालो आहे. मी तुला सहाय होतो- चल. कोण्याही चक्रवर्तीने गाजविला नाही; असा दिग्विजय गाजव! हा समुद्र, ह्या समुद्राच्या पार असलेली ती पुरातन द्वीपे मनुष्याला अजून अज्ञात असणारी ती नूतन द्वीपांतरे, खंडे, जगते ह्यांच्या सम्राट्पदाचा राजमुकुट मी तुला मिळवून देतो. चल! असा नुसता बसून तू फार तर कोणी गोसावडा होऊ शकशील; पण तू तेवढ्यासाठीच जन्माला आला नाहीस! तू जन्मताच राजज्योतिषांनी भविष्य वर्तविले होते ना; की तू चक्रवर्ति होशील? घे तर अशेष द्वीपांच्या राजमुकुटांना ओतून घडविलेला हा महान् चक्रवर्तित्वाचा मुकुट, मी तुला देतो तो घे! सिद्धार्थ!

सिद्धार्थ : (ध्यानावस्थेत किचित् डोळे किलकिले करून) माझी समाधि कोण भंगू पहात आहे? त्यास मी ओळखतो. मारा! त्या तुझ्या राजमुकुटातील प्रत्येक पाचेच्या, माणिकाच्या आणि रत्नाच्या आतून तृष्णेची असह्य अशमनीय आग पेटलेली आहे. जिवंतपणी ही पेटवलेली चिता डोक्यावर घेऊन तूच हिंड! आकाशात नयनदायी चंद्र उगवला असता जसे सर्व तप्त त्रिभुवन त्या सुधाकराच्या कौमुदीत न्हाऊन शीतल होते; तसाच माझ्या चिदाकाशात ह्या प्रसादमय विवेकाचा उदय होताच, माझा अंतरात्मा संतृप्त शीतल नि शांत झाला आहे. एका जीवास जरी मी दुःखापासून अशेष दुःखापासून मुक्त करून असा परमानंद देऊ शकलो, तरी मी माझ्या ह्या जन्माचे आणि ह्या साधनेचे जितके सार्थक झालेसे मानीन; तितके लाखो लोकांना पीडा देऊन प्राप्त केलेल्या ह्या उभ्या पृथ्वीच्या चक्रवर्तीत्वाच्या प्राप्तीने मानणार नाही! जा! मारा, दूर हो, जा!

(तोच, मार धक्का बसल्यासारखा होऊन कोलमडत मागे सरतो. वासना त्यास सावरते. आणि आपण पुढे होऊन शुभ्र पटलाशी लगटून सिद्धार्थांना म्हणते.)

वासना : राजपुत्र! आपण माराला जे उत्तर दिलेत, ते अगदी यथार्थ होते. भीतिसंकुल आणि प्रपीडक राज्यतृष्णेत कसले सुख असणार? पण नयनानंददायी चंद्र उगवताच त्याच्या कौमुदीत न्हाताना जे सुख होते; म्हणून तू आताच म्हणालास; ते सुखही तितकेसे आल्हाददायक नाही. त्या कौमुदीत न्हाताना एकान्तामध्ये कमलकोमल कामिनीच्या कामलोलुप आलिंगनात जे सुख असते; तेच सर्व सुखात अत्यंत आल्हाददायी होय! ये, सिद्धार्था, माझ्या आलिंगनात ते सुख भोग, ये! मी त्रैलोक्यसुंदरी आहे. तू त्रैलोक्यवीर आहेस. मी तुला वरू इच्छिते! माझ्या आलिंगनात ते आल्हाददायी सुख चिरंतन भोग ये!

सिद्धार्थ : चिरंतन? आज तू यौवनाने मुसमुसलेली दिसतेस; पण तुझी ही लावण्यवती काया जेव्हा वार्धक्याने कुबडी, अंधुकलेली, चिपडलेली, सुरकुतलेली..

वासना : ती भीतीच नको! माझे यौवन चिरंतन राहील, असा मला वरच मिळालेला आहे.

सिद्धार्थ : तरी काय! तुला तसा वर मिळालेला असला तरी ज्या वराला तू वरू इच्छितेस; त्या वराला तो वर मिळालेला नाही! मी केव्हा तरी म्हातारा होणारच; रोगी होणारच; माझी सारी अंगे, उपांगे जीर्णशीर्ण शिथिल होणारच! तेव्हा माझी कामेच्छा विझलेल्या अग्नीप्रमाणे राख होऊन जाईल. तू मला निर्माल्यव्रत् होशील!

वासना : पण-

सिद्धार्थ : चूप! एक अक्षरही अधिक बोलू नकोस! ज्या स्वतःच्या देहाची स्वतःलाच शिसारी येते; अशा घृणास्पद देहाच्या ओंगळ आलिंगनाचे आमिष मला दाखवू धजणारी ही दुसरी तिसरी कोणी नसून; होय ओळखली मी हिला; ही वासनाच असणार! वासने, चालती हो!

(त्यासरशी धक्का बसून वासना थरथर कापत, मागे कोलमडत, माराच्या अंगास टेकते.)

वासना : अगबाई! ओळखले याने मला! मारा, माझे रक्षण कर! हा मला जाळून भस्म करील!

मार : कोण कोणाला भस्म करतो ते आताच दिसेल. कांचन आणि कामिनी ह्या माझ्या दोन अमोघ शस्त्रांची धार ह्यांच्यावर बोथट झाली. सामदामाने हा बधत नाही. पण म्हणून काय झाले! उठा तर आता! हे जगतातील विनाशक शक्तींनो उठा! वादळांनो! वणव्यांनो! फूत्कारीत, आग ओकीत उठा! विजांच्या चाबकाखाली सृष्टीची पाठ सडकीत उठा! इत्यादी ह्याची साधना आज भंगली नाही; तर ह्याला माझ्या नाशाचा उपाय सापडून हा मला भस्म करील! त्या आधीच प्रळयाच्या जबड्यात जाळून भस्म केला पाहिजे, ह्या भंगडाला! फूः फूः फूः फूः!!

(त्यासरशी अकस्मात दृश्यांतर (ट्रान्सफरसीन) होऊन वादळ, विजा, गडगडाट ह्यांचा कल्लोळ माजतो. रानात वणवा पेटून झाडे कडकड मोडू लागतात. तोच यमराज प्रकट होऊन आपल्या दूतांकरवी माराला आणि वासनेला रेटीत रेटीत मागे घेऊन जातात.)

सिद्धार्थ : गर्जन! गर्जन! देवरिपु मार चळताळून माझ्या साधनेच्या ह्या दृढासनास ढळवू पहात आहे! पण प्रळय होवो वा प्रभव होवो; हे आसन अढळच राहणार! हे माझ्या साधनेचे आसन जगत्कल्याणाच्या रहस्याचे परममंगल ज्ञानपीठ होईतो माझी साधना अशी सफल होईतो - मी आता ढळणार नाही.

इहासने शुष्यतु मे शरीरम् ।
त्यगस्थिमांसे प्रळयम् च यातु ।
अप्राप्य बोधि बहुजन्मदुलर्भाम् ।
नैहासनात् कायमितः चलिष्यति ।।
ॐ शांतिः शांतिः शांतिः । ॐ सर्वदिक शांतिः शांतिः शांतिः!

(सिद्धार्थ समाधिस्थ होतात. वादळ शांत होते. ज्वाळा मागे हटून सिद्धार्थाभोवती इंद्रधनुष्यासारखी आर्द्र नि शीतळ प्रभावळ धरून तरंगत राहतात. सारे वन प्रफुल्ल नि प्रसन्न दिसू लागते. किचित् कालानंतर अंतरिक्षातून पुष्पवृष्टि होऊ लागते; आणि मंजुल गीत स्त्रवू लागते: "सिद्धार्था! तू धन्य झालास! तू बुद्ध झालास! ॐ नमो भगवते बुद्धाय। ओम् नमो भगवते शुद्धाय। ओम् नमो भगवते प्रबुद्धाय!। नमो नमः।")

सिद्धार्थ : (किंचित डोळे उघडून तर्जनीवर तर्जनी ठेवून) सापडला! सुखदुःखाच्या द्वंद्वापासून मुक्त होण्याचा मार्ग सापडला! सुटलो! अनादि जन्ममरणाच्या भवचक्रातून मी सुटलो! ते संपताच

तो स्नेहक्षय होताच दिवा जसा आपला आपल्यातच आपोआप विझून जातो; तसा वासनाक्षय होताच; क्लेशक्षय होताच; हा माझा मीपणा, माझ्यातच आपोआप विझून गेला! सविकल्प नाही; निर्विकल्प नाही; केवल निर्वाण! केवल शून्य!

गृहकारक दिट्ठोसि पुनर्गेहं न काहसि ।
सर्वास्ते फासुका भन्ना गृहकूटे च नश्यति ।।

(त्या उच्च शिलेच्या आसनावरून उठून सिद्धार्थ खाली उतरतात. प्रसन्नवदनाने किंचित्काल आसमंतात पहात नि विचार करीत, फिरत, मध्येच उभे राहून, स्वगत) मीठ पाण्यात वितळून जाते, तसे आता ह्या दिव्य, अमृतशील, आनंदमय समाधीतच मला हा देह गळेतो विरून जावेसे वाटते. परंतु जन्म-व्याधि-जरा-मृत्यु हयांच्या महादुःखांनी गांजलेल्या ह्या जगतास पाहून माझे हृदय दयेने द्रवून जात आहे. करुणेने कसे कासावीस होत आहे! ह्यास्तव ह्या अशेष दुःखापासून, ह्या प्राणीमात्रांना मुक्त करण्यासाठी मी माझ्या निरुपाधिक कैवल्यानंदाला सुद्धा लोककल्याणाची उपाधि, हा देह आहे तो उरू देणारच देणार! ऐका, प्राणिमात्र हो! ह्या अशेष दुःखापसून मुक्त होण्याचा उपाय आहे! आणि तोहि स्वतःचा स्वतःलाच साधण्यासारखा सुलभ! ह्या अशेष दुःखांचे मूळ-तृष्णा! त्या मूळ कारणाचा क्षय तो तृष्णाक्षय म्हणजेच अशेष दुःखांचा आत्यंतिक नाश. त्याचा उपाय म्हणजेच त्याग!

न कर्मणा न प्रजया धनेन!
त्यागेनैकेन अमृतत्वमानशुः ।।

त्याग, संन्यास, संसृतीचा संन्यास, स्वर्गाचा संन्यास, स्वत्वाचासुद्धा संन्यास!! आता ईश्वराचे अवडंबर नको, यज्ञाचे स्तोम नको! मानवांची भीति नको, दानवांची भीती नको, फार काय; देवांचीसुद्धा भीती नको!! आज मनुष्य देवांच्या दास्यातूनसुद्धा मुक्त झाला!! हे अभयदान अवघ्या मानवजातीस देण्यासाठी आणि ह्या बुद्धतत्वाचा प्रचार दीपद्वीपातंरी करण्यासाठी मी प्रतिज्ञा करतो की

चरिष्यामि चारिकम् बहुजनहिताय
बहुजनसुखाय लोकानुग्रहाय च ।

(सिद्धार्थ जाऊ लागतात. आकाशातून पुन्हा पुष्पवृष्टि होते. अंतरिक्षातून मंजुल संगीत स्त्रवू लागते. ''शुभास्ते पंथानः संतु । संतु शिवाः ओम् नमो भगवते बुद्धाय । नमो भगवते शुद्धाय । नमो प्रबुद्धाय। नमो नमः ।।)

(पडदा पडतो.)

**अंक तिसरा प्रवेश पहिला**

(यशोधरा, मंजुळा आणि मधुरा)

यशोधरा : सखे मधुरे! बाळ राहुल कुठे ग खेळतो आहे? मधुरे! बोलाव तरी त्याला इकडे.

मधुरा : यशोधरे! फारच बाई, लळा लागला आहे तुला ह्या तुझ्या मुलाचा; राजकुमार राहुलचा. तो आता चांगला आठ वर्षांचा झाला आहे. आता तो खेळगड्यांबरोबर गुंगून असा घटका घटका दूर रहायचाच. एकुलते एक मूल झाले म्हणून काय इतर आया त्याला आपल्या पायाला बांधून ठेवतात की काय?

यशोधरा : मधुरे! इतर आयांना त्यांचे स्वतःचे खेळगडी असे माझ्यासारखे टाकून गेलेले नसतात. त्या भाग्यवती स्त्रिया आपल्या स्वतःच्या सवंगड्यांशी एकांतात निर्भयपणे हसत, बोलत खेळता यावे; म्हणून आपल्या मुलांना उलट दूर धाडून देतात. 'मुलांबरोबर थोडा वेळ जा आता; असे सांगून. पण मधुरे! माझा सवंगडी, माझे सिद्धार्थ गौतम - नको ती आठवण आणि नको ती आशा!

मधुरा : नको बाई! आता त्यांना सिद्धार्थ असे माणसासारखे संबोधू नकोस हो. आताशी लोक म्हणतात ना की ते कायसे देवपदाला पोचून बुद्धत्व पावले आहेत म्हणून. यज्ञाच्या आगीत होरपळणाऱ्या पशूंच्या यातना पाहून त्यांनी म्हणे, यज्ञसंस्थेचा निषेध चालविला आहे. पण यशोधरे! जीव, यज्ञांच्या आगीतच तेवढा होरपळतो असे नाही. वियोगाची आगही तशीच जनमानसाची राखरांगोळी करते. यास्तव वियोगाच्या आगीत धर्मपत्नीला, वृद्ध पित्याला नि नवजात पुत्राला आणि आम्हा सगळ्या सोयऱ्यांना होरपळत टाकून; त्यांच्या यातनांच्या पायऱ्यांवरच जे बुद्धत्व संपादता येते, तेही तितकेच निषेधार्ह नाही काय? मला किनई त्या परमपूज्य, पुण्य पुरुषाविषयी फार आदर वाटतो. पण असह्य दुःखापायी असे त्राग्याचे विचार केव्हातरी चित्तात आल्यावाचून राहात नाहीत.

यशोधरा : मी देखील जेव्हा ह्या वियोगाच्या दुःखाने अशी व्याकुळ होते, तेव्हा मनास असे म्हणते; मना! सिद्धार्थावर तुझे प्रेम आहे ना? मग सिद्धार्थाचे तुझ्या दैवताचे जीवास, ज्या योगे सुख वाटले; त्यातच तूही सुख मानले पाहिजेस. बाळ राहुल, ही त्यांचीच मूर्त स्मृती आहे.

तो झाला नि त्यांनी संसार त्याग केला. सिद्धार्थाचे वियोग दिवस मोजण्याच्या मण्यांची माळ राहुल ही एक रत्नमालाच आहे. ती स्मरणी हाती धरून मी त्या देवांचा जप करीत असते.

मंजुळा : वियोग दिवस आठवण्याची ती जशी स्मरणी आहे ना, तशीच वियोग दुःख विसरविण्याची ती विस्मरणीही आहे हो! माझ्या त्या लाडक्या भाच्याच्या हसऱ्या आणि खेळकर संगतीत सारे दुःख क्षणभर कसे अगदी नाहीसे होते. रडता रडता हसू येते. मारतेच हाक त्याला. राहुल! बाळ राहुल! (राहुल बगळ्या बदकासारख्या माना वेळावीत येतो.)

मधुरा : हे काय लक्षण? ह्या माना कसल्या वेळवतो आहेस?

राहुल : आम्ही की नाही, त्या सरोवराच्या तीरावर हंस, बदके ह्यांना दाणे टाकीत आहोत. तिथे त्यांचे थवेच्या थवे अशा माना डोलवीत, अशा गिरक्या घेत, दाणे टिपीत आहेत. तसे तसे मी शिकतो आहे. कशाला ग मावशी मला बोलावले आहेस उगीचच्या उगीच? पाखरांकडे जातो मी खेळायला.

मंजुळा : (हात धरून) अरे! उगीचच्या उगीच नाही हाक मारली तुला. तुला खेळायचे म्हणजे तू नाही का पाखरांना हाक मारीत! तसे आम्हांला पण खेळायला एक पाखरू हवे. म्हणून आणले हो हे धरून. (त्याची हनुवटी नि हात धरते. तो ओढे घेतो.) यशोधरे! मोठा अचपळ बाई हा तुझा मुलगा झाला आहे! वडिलांच्या अगदी उलट! ह्याच्या वडिलांना लहानपणापासून आसनमांडी घालून ध्यानस्थ बसायचा छंद! तर ह्याची सदा धावपळ नि खेळखंडोबा!

राहुल : ते कोण वडिल म्हणतेस; ते कसे ग बसत? ध्यानस्थ? दाखव मला? मी पण तसा बसतो हं! कधी शिकवलेस का, मला ते! आपण चुकी करी; दुसऱ्याच्या नावे हाका मारी!

मंजुळा : बरे बघ हं! (मांडी घालून मंचावर बसते.) समोर कोणी नको असे त्यांना.

राहुल : बरे! हा मी, तुझ्या पाठीशी उभा राहतो. मी तुझ्या खांद्यावरून पाहतो हं! कसे डोळे मिटतेस; ध्यान धरतेस ते! (पाठीमागून पाहण्याच्या गडबडीत काही पिसे तिच्या केसात खोवतो. यशोधरेस चूप रहा म्हणून खुणावतो. सर्व हळूच हसतात.) अग! डोळे उघडतेस! हीच का तुझी शांतता?

मंजुळा : मग तुम्ही हसलात का?

राहुल : आम्ही लाख हसलो ध्यानात, वडिलांना कळत का असे? वा मावशी! काय पण छान दिसते आहेस? यंव यंव!

मंजुळा : चावटा! चेष्टा करतेस? काय ग यशोधरे? ह्याने माझी खोडी केली, तू का हसतेस? इश्श! सांग ना! इश्श!

राहुल : नको ग सांगूस आई. मावशी करते इश्श्य फिश्श्य; मावशीच्या डोक्यात पाखराची पिस्स! (गाणे म्हणत उड्या मारतो.)

मंजुळा : सांग ना ग यशोधरे! इश्श! तुला बहिणीपेक्षा मुलगा अधिक झाला ना?

यशोधरा : अग दुसरे काही नाही; त्याने की नाही, तुझ्या केसात कुठलीशी पाखराची पिसे खोवलीत हो चोरून.

राहुल : (मंजुळा धरायला जाते, तो सुटतो.) आई! तुला मुलापेक्षा बहिण अधिक जवळची झाली ना? मावशी करते; इश्श्य इश्श्य! मावशीच्या डोक्यात पाखराची पिस्स! (चिडवीत, पाठमोरा हटत सुटून जातो.)

(इतक्यात दासी प्रवेशून)

दासी : राज्ञी! देवीने ऐकावे; ऐका! अवश्य, आनंदाची बातमी ऐका. सिद्धार्थ, आपल्या ह्या कपिलवस्तूस परत येणार आहेत.

मधुरा : म्हणतेस तरी काय हे? अग कुणी सांगितले?

दासी : गळ्याशपथ ते परत येणार आहेत. तिकडे त्यांचे परम ध्येय प्राप्त करून ते बुद्ध झाले! मोठमोठे राजे, महाराजे त्यांचे शिष्य झाले! विपुल आणि भल्लक, धनाढ्य व्यापारीही, ऐकावे ते एकेक आश्चर्यच! सर्वजण राजवाड्यात शुद्धोधन महाराजांना सांगत आहेत; आणि तुम्हाला तीच आश्चर्ये ऐकण्यासाठी तत्काल तिकडे बोलावले आहे! राजपुत्र सिद्धार्थ, कृतार्थ होऊन त्यांच्या हया जन्मभूमीस येण्यास निघाले देखील आहेत!

मंजुळा : कोण धन्य दिवस आहे हा! आपला प्रियकर सिद्धार्थ परत येणार!

यशोधरा : चुकलीस बाळे! सिद्धार्थ? नव्हे; बुद्ध! गेले ते ---प्रियकर सिद्धार्थ!---येताहेत ते संन्यासी बुद्ध!

मंजुळा : काही असले; तरी, भेट तर होईल.

यशोधरा : पुन्हा चुकलात! मधुरे! भेट? नव्हे; दर्शन! माणूस आपल्याला भेट देतो; पण देवाचे नुसते दुरून दर्शन! मनुष्याचे ते अगदी देव झाले आहेत!

मंजुळा : ऐकू तर! चला! काय आश्चर्ये सांगताहेत ती!

**अंक तिसरा प्रवेश चौथा**

(यशोधरेचे अंतःपुर)

मधुरा : हे काय बरे यशोधरे! राजपुत्र सिद्धार्थ प्रत्यक्ष राजवाड्यात येऊन उभे असता, तू अशी इथेच का बरे राहावेस? वास्तविक पाहता सर्वांचे आधी तूच राजवाड्याचे महाद्वारी जाऊन त्यांचे स्वागत करावयास पाहिजे होते! सर्व नगरचे नगर त्यांचे हे इतक्या नवसासायासांनी एखाद्या महान पर्वणीसारखे प्राप्त झालेले दर्शन घेण्यास दाटले असता; देवी! तुला असा कोणचा विलक्षण संकोच इथे अंतःपुरातच थोपवून धरीत आहे बरे? वेडे! ज्यांच्या प्रेमासाठी आज आठ वर्षे तू अशी तळमळत राहिलीस; ते राजकुमार सिद्धार्थ स्वतः परत येऊन राजवाड्यात उभे असता, आता त्यांच्या प्रेमाची आणखी परीक्षा ती काय पाहायची?

यशोधरा : त्यांच्या प्रेमाची परीक्षा का मधुरे! मी पाहात आहे? त्यांच्या नाही! माझ्या प्रेमाची! माझे त्यांच्यावर खरे प्रेम आहे की नाही? ह्याची परीक्षा मी पाहात आहे. अग, त्यांच्या निर्वाण सुखाच्या मार्गात मी आड येत होते; म्हणूनच ते माझा त्याग करून गेले ना? आणि आता ते त्यांचे महान ध्येय साधून जे आले आहेत ते जगाच्या दुःखास दूर करण्यासाठी! संन्यास घेऊन आले आहेत ना? मग जशी, त्या त्यांच्या त्यागाच्या मार्गात मी पूर्वी आडकाठी होते, तशीच ह्या त्यांच्या संन्याशाच्या मार्गातही मी आडकाठीच होणारी नाही का? वेळेवर स्वतः दुःखाच्या गर्तेत पडावे लागले तर पडून प्रियाच्या सुखाचा मार्ग मोकळा करावा! हीच प्रेमाची खरी कसोटी आहे! मी माझे प्रेम त्या कसोटीस उतरते की नाही हे पाहणार आहे! मी त्यांच्या प्रेमाची परीक्षा पाहात नाही. मी माझ्या प्रेमाची परीक्षा पाहात आहे. प्रियाच्या इष्टास माझ्या प्रेमाची दृष्ट लागू नये म्हणून त्याचे दर्शनही टाळण्याइतके ते माझे प्रेम संयत आहे की नाही ते मी पाहात आहे.

मंजुळा : (प्रवेशून घाईघाईने) अग ताई! यशोधरे! मधुरे! अग हे काय? सिद्धार्थांचा स्वागत-सत्कार-समारंभ जवळजवळ उरकतच आला असताही अजून तुम्ही तिथे कशा दिसत नाही? त्याचा जो तो अचंबा करीत आहे! शुद्धोधन महाराजांनी बोलावण्यावर बोलावणी धाडली! तेव्हा हे मानिनी, हा रुसवा सोड आणि राजपुत्राचे दर्शनास चल.

यशोधरा : काय? रुसवा? वेडे! कुठे आहेत राजपुत्र? माझे ते दैवत? आता ह्या माझ्या केसांच्या पायघड्या घालीत त्यांना घेऊनच येते! चल! मंजुळे! हे आले आहेत, ते राजपुत्र नसून

संन्यासी आहेत. स्त्रियांचे दर्शनही त्यास विहित नसते. त्यातही स्वस्त्रीचे दर्शनाने तर त्यांच्या ब्रह्मचर्यव्रताला विटाळच झाल्यासारखे होते. तू म्हणतेस लोकात, जो तो मी आले नाही; ह्याचा अचंबा करीत आहे. पण लोकांना काय! मी आले असते आणि संन्यासी बुद्धाने डोळे मिटून मला चालती हो म्हणून खूण केली असती; तर हेच लोक, म्हणाले असते; आणि म्हणतील; ही बया, एखाद्या खुळ्यासारखी आली कशाला भर राजसभेत त्या महाथोर संन्याशापुढे? हो! कारण साधारणतः स्त्रियांचा जो जितका अधिक तिरस्कार करतो; तो संन्यासी तितका अधिक थोर समजला जातो!

मंजुळा : अग पण ताई! बुद्धांनीच तुला दोनदा विचारले ना? यशोधरा कुठे आहे म्हणून?

यशोधरा : खरेच का त्यांनी स्वतः विचारले? चल! उगीच काहीतरी सांगतेस आपली! त्यांना बुद्ध होऊन मला विचारावयाचे असते तर ते सिद्धार्थ असता मला आधी टाकूनच का गेले असते?

मधुरा : नाही ग यशोधरे! खरेच त्यांनी विचारले बरे! चल, सर्व संकोच सोडून दे. (त्यांच्या बरोबर यशोधरा चालू लागते.) अगदी, माझ्या समक्ष विचारले. ''पण यशोधरा कुठे आहे?''

यशोधरा : (लगेच थांबून) खरेच! इतकेच विचारले ना? तर मग त्यावरून इतकेच सिद्ध होते की महाबुद्धांनी, संन्याशांनी जिचे नावही उच्चारू नये, इतकी काही यशोधरा कुणी दुर्दैवी पतित नारी नाही! पण यशोधरा कुठे आहे हे त्यांनी अशासाठीच विचारले नसेल की ती जिथे असेल; ते स्थळ त्यांना टाळता यावे?

मंजुळा : अग! पण आपल्या राजकुमार सिद्धार्थांचा स्वभाव असा शब्दच्छल करणारा का आहे यशोधरे? त्यांची तुझी ही पहिलीच का ओळख आहे?

यशोधरा : (उसासा टाकून) राजकुमार सिद्धार्थांची माझी पहिली ओळख माझ्या जीवननाटकाच्या यौवनाच्या पहिल्या प्रवेशातच झाली. पण सखे न बोलावता पुढे जावे इतकी माझी ओळख संन्याशी बुद्धाशी काही झालेली नाही! ते काही नाही. हे पहा मंजुळे! आपणहून मला कोणी विचारलेच तर साफ सांग! सिद्धार्थांच्या सिद्धीस त्या हतभागिनी यशोधरेच्या भेटीने काहीही हानी पोचण्याचा संभव नसेल आणि तिला भेटण्याची सिद्धार्थांची इच्छा असेल तर सिद्धार्थांनीच अंतःपुरातील त्या देव मंदिराकडे यावे. यशोधरेच्या अंतःपुराचा बुद्धांना विसर पडलाच असेल तर

त्याचा पत्ता राजघराण्यातील कोणतीही दासी त्यांना तो सांगेल. जा! मंजुळे! थांब थांब! यशोधरेला आणा, असे त्यांनी स्पष्ट सांगितले तरच हे सांग हो. अग ऐकून तर घे नीट! 'यशोधरा कुठे?' इतकेच विचारले तर हे भेटीभेटीचे बोलू नकोस हो! ह्या प्रश्नास 'अंतःपुरात' इतकेच सांग. अग! सिद्धार्थ, सिद्धार्थ असे म्हणू नकोस! माझा निरोप सांगताना 'तथागत बुद्ध' असेच नाव घेत चल हो! जे आहे ते बोल! उगाच लघळपणात दुसरे काही जोडू नकोस!

**अंक तिसरा प्रवेश पाचवा**

(बुद्ध आणि दोन शिष्य)

बुद्ध : शारीपुत्र! मौद्‌गलायन! आम्ही आता देवी यशोधरेच्या अंतःपुरात जाऊन तिची एकांत भेट घेणार! त्या समयी माझ्या अनेक शिष्यांतून तुम्हा दोघा विश्वासू शिष्यांसच मी ह्यासाठी बरोबर घेत आहे; की, मी यशोधरेची अशी भेट का घेत आहे? ह्याचे हृद्‌गत तुम्हासारख्या माझ्या एकनिष्ठ आणि मर्मज्ञ शिष्यांसच समजणारे आहे. सामान्य लोकांस हे माझे आचरण क्वचित् अनुचितही वाटेल!

शारीपुत्र: तसे ते वाटेलही महाराज काहीजणांना! आपण यशोधरेकडे एकटे जाता हे ऐकताच आक्षेपसूचक दृष्टिपात करून काही जण उपहास करताना म्या आताच पाहिले!

बुद्ध : आणि मी यशोधरेचे मुखदर्शनही न करता तसाच निघून गेलो असतो तर हेच किवा इतर लोक मला निर्घृण, क्रूर, कठोर म्हणून तसेही दोष देते! जसा मी यशोधरेचा त्याग केला; तेव्हा त्यांनीच दिला! यशोधरेचे वडील मी संन्यस्त झालो म्हणून, मला, भर सभेत अत्यंत अश्लील वाक्य बोलले नाहीत का; काल?

मौदगलायन : तथागत बुद्धाने ती सर्व अभद्र निंदा किती शांतपणे ऐकून घेतली! तुल्यनिदा स्तुतिर्मौनी अशा योगारूढावस्थेचा जसा एखादा निश्चल सुवर्ण पुतळाच अशी तथागत बुद्धांची ती शांत मूर्ती तेव्हा शोभत होती!

बुद्ध : हे पहा! यशोधरेने आज आठ वर्षांवर आपल्या हृदयात दाबून ठेवलेला तिचा प्रेमाचा उमाळा मला पाहताच बहुधा अनावर होईल आणि ती भावनांच्या आवेगासरशी मला मिठी मारील! असे झाले असता तुम्ही तिला निवारू नये! वैयक्तिक प्रीतीच्या ह्या प्रेयसीच्या अवगुंठनातूनच संसार त्यागाच्या श्रेयसाचे कटुतम औषध मला तिला पाजले पाहिजे!

शारीपुत्र: जशी तथागतांची आज्ञा! हेच ते देवी यशोधरेचे अंतःपुर! (पडदा उघडतो. यशोधरा, बुद्धाला पाहताच, अश्रूविव्हल होऊन, पाठमोरी उभी होते. मंजुळा, मधुरा तिला ‘अग चल! असे काय नमस्कार कर!’ म्हणून कुजबुजत सांगतात.)

सिद्धार्थ : देवी यशोधरे!

यशोधरा : (स्फुंदत एकदम बघून) कोण! माझे सिद्धार्थ! माझे प्राणपति! माझे जिवलग! (धावत जाऊन मिठी मारीत जिवलगा! जीवनाची ही सात-आठ वर्षे मी कशी काढली; ह्याची आपणास काही कल्पना तरी आहे काय? सिद्धार्थकालात माझ्यावर असलेले प्रेम बुद्धकालात परिक्षीण झालेच असेल; तरीही-

बुद्ध : परिक्षीण नव्हे परिपूर्ण! यशोधरे! मागे जे आपले एकमेकांवर प्रेम होते, ते देहाधिष्ठित तृष्णेच्या ज्वालेचे प्रतिबिंब होते! म्हणूनच तुझ्या माझ्या देहाच्या अवश्यंभावी पालटाबरोबर ते प्रेमही पालटत जाणारे होते! देहाच्या व्याधीने, व्यंगाने, जरेने जे प्रेमही व्यंग आणि जर्जर होणारे असल्याने; ते प्रेम, तिटकारा आणणारे होते! म्हणूनच मी अपार आणि अनंत आणि अमर अशा कोण्या प्रेमाची न सुकणारी नवी वरमाळ तुला घालावी, यास्तव क्षणिक वियोगाच्या व्रतास अंगिकारले. यशोधरे! तू त्या क्षणिक वियोगाचे दुःख आता ह्या चिरंतन संगमाच्या सुखात विसरून जा! पूर्वीच्या त्या दैहिक स्वयंवरात मी तुला नि तू मला वरमाला घातल्या, त्या त्या स्वयंवरातील आपल्या प्रेमासारख्या सुकणाऱ्या फुलांनी गुंफलेल्या होत्या; आता ह्या आत्मिक स्वयंवरात ही कधीही न सुकणाऱ्या निर्वाण सुखाच्या पारिजातक फुलांची वरमाळ मी तुला अर्पण करीत आहे! पूर्वीची प्रीती ही केवळ तृष्णा होती! आताची प्रीती ही प्रत्यक्ष तृप्ती आहे! प्राणिमात्राच्या अशेष दुःखाचे मूळ तृष्णा! तिचा समूळ क्षय हेच निर्वाण! दुःखाचा आत्यंतिक निकष; तो चरम शांतीचा, परम मंगलास्पद मार्ग मी प्राणिमात्रास उपलब्ध आणि अनावृत्त करून दिला आहे. यशोधरे तू तर माझी सहधर्मचारिणी आहेस! तुला त्या निर्वाण शांतीच्या मंगलमय मार्गावर तथागत बुद्ध हे स्वयमेवच हात धरून सांभाळून नेतील!

यशोधरा : महाराज! अशा देवभाषेचा अर्थ माझ्या माणुसकीच्या भावनांनी व्याकुळ झालेल्या मनाच्या आकाशात, विजेसारखा दिपवीत काही चमकतो; काही लपतो! तेव्हा देवा! आम्हा माणसांच्या अल्लड बोलातच, मला एकदा स्पष्ट सांगावे की, सिद्धार्थांच्या चरणांचा जसा मला मध्येच वियोग झाला; तसा आता बुद्धांच्या चरणांचा तरी कधीही होणार नाही ना? इतके दान मला आता आपण द्यावेच! तीच माझी साधना! त्या साधनेनेच मलाही निर्वाणाची परमशांती लाभो!

सिद्धार्थ : तथास्तु! तथास्तु! तथास्तु! (चालू लागतात.)

यशोधरा	:	म्हणजे? मधुरे! मंजुळे! अग हे गेले की! एखाद्या युगासारख्या सुदीर्घ वाटणाऱ्या कालानंतर भेटून पुरते प्रस्तावनेचे दोन शब्द संपतात तो गेले देखील!

मंजुळा :	अग गेले म्हणजे अंतःपुरातून गेले इतकेच! आधी ते आपणास त्यांच्या भेटीस जाण्याची अनुज्ञा देऊन गेले! नाही का ग मधुरे? (इतक्यात राहुल येतो.)

राहुल :	आई! आई! ते बुवाजी इकडे, तुझ्याकडे येऊन गेले. खरे काय ग? मग मला नाही ते बोलावलेस? म्हणूनच मला दुसरीकडे लावून दिलेस? तुला त्यांना एकटे एकटे भेटायचे होते; नाही काय ग? लबाड कुठली! ते, कोण ग! तुझे ते? माझे कोण? कोणचे ग! ते त्या संन्याशातले?

यशोधरा	:	बाळा, तो बघ! त्या सर्वांच्या अग्रभागी देवासारख्या तेजोवलयाने जो मंडित आहे; तनया, तोच पुरुषसिंह तुझा पिता आहे बरे! चल त्यांच्या भेटीला! तुझा औरस अधिकारच आहे! चल! तो अधिकार गाजीव; चल!